# बालबोध
# BALABODHA.

## पुस्तक चौथें.

१८८४ एप्रिल—१८८५ मार्च



मुंबई

"निर्णयसागर" छापखाना

१८८५.

# अनुक्रमणिका.

## किरकोळ.

# बालबोध.



## रावबहादुर केरोलक्ष्मण छत्रे.



ह्या जगामध्यें कांहीं माणसें अशीं होऊन जातात कं त्यांचें जगणें आणि मरणें हीं त्यांना स्वतःला सुखाव आणि भूषणावह होऊन, तीं इतर जनांस कित्त्यांप्रमा उपयोगीं पडतात. ह्मणजे, जीवंतपणीं तर त्यांच्या ह तून जनांवर उपकार होत असतातच; पण, तें उपकार-करण मरणानंतरही चाललें असतें. अशीं मनुष्यें खरो-खर धन्य होत. तीं संसारविचार करून जरी जगांत राहिलीं, तरी त्यांची गणना महासाधूंमध्यें व्हावी, हें योग्य आहे. आमचे केरोपंत छत्रे हे अशा प्रकारच्या मनुष्यांतले होते. त्यांचें चरित्र आह्मी येथें थोडक्यांत सादर करितों.

कुलाबा जिल्ह्यामध्यें नागांव ह्मणून एक खेडें आहे, तेथें इ० स० १८२४ च्या मे महिन्यांत केरोपंत नानांचें जन्म झालें. त्यांचे वडील, ते लहान असतांच निवर्तल्यामुळें, त्यांच्या पालनपोषणाचा सगळा भार त्यांच्या चुलत्यावर पडला. तो चुलता मुंबईस रहात असे. त्याच्या जवळ नाना असत. मुंबईच्या एल्फिन्स्टन् कालेजामध्यें जी मंडळी अगदीं प्रथम तयार झाली, त्याच मंडळींतले हे होत. ह्यांस लहानपणापासून गणितविद्येचा नाद फार असे. तो इतका ह्मणून सांगतात कीं, जेवीत असतां, भाताच्या आकृति करून, त्यांविषयींच्या विचारांत नानांचें मन एकदां गुंतलें, ह्मणजे, दोन दोन घटिका त्यांस जेवायाचा विसर पडत असे. त्यांचे गुरु अर्लिबारसाहेब आणि बाळगंगाधर शास्त्री जांभेकर हे होते. त्यांस नाना फार आवडत असत. कांकीं, ते स्वभावानें फार चांगले असून, ते आपला विद्याभ्यास उत्तम रीतीनें करीत असत. त्यांची परीक्षा एकदा फार चांगली उतरल्यावरून त्यांना एक पदक बक्षीस मिळालें होतें. विद्याभ्यास पुरा झाल्यावर नानांस, इ० स० १८४० ह्या वर्षीं, कुलाब्याच्या दांडीवर पन्नास रुपये दरमहाची जागा मिळाली. तेव्हांपासून हळूहळू वाढत जाऊन, इ० स० १८६५ ह्या वर्षीं पुण्याच्या पाठशाळेंत ते गणितशास्त्राचे मुख्य गुरु झाले, आणि शेवटीं शेवटीं त्यांस दहा बाराशें रुपये दरमहा मिळूं लागले; आणि त्यांचा लौकिक पुष्कळ वाढला. इ० स० १८७७ ह्या वर्षीं, नामदार लार्ड लिटन, गव्हरनर जनरल ह्यांनीं, दिल्लीच्या दरबारांत, नानांस "रावबहादुर"

हा किताब दिला. पुढें दोन वर्षांनीं, ह्मणजे इ० स० १८७९ ह्या वर्षीं नानांनीं पेनशन घेतलें. तें त्यांस दर-साल पांच हजार रुपये झालें.

सरकारी काम सोडिलें, तरी, नानांचा विद्याव्यासंग चाललाच होता. ग्रंथावलोकन किंवा शिक्षण ह्यावांचून त्यांचें एक पळही जात नसे. त्यांच्या मनांत अनेक वि-चार घोळत असत. ज्या पृथ्वीवर आपण राहतों, त्या पृथ्वीची रचना कशी झाली असावी, ह्याची कल्पना बसविण्याचा एक विचार त्यांमध्यें होता; आणि त्यासं-बंधीं कांहीं प्रयोगही त्यांनीं करून पाहिले होते. परंतु त्यांचें पुढें काय झालें हें समजलें नाहीं.

त्यांची शरीरप्रकृति निरोगी होती. परंतु, आलीकडे बरीच अशक्त झाली होती; आणि त्यांच्या पायास भेग पडून, ती पुवळून, तिच्या योगानें त्यांस फार त्रास होत असे. ते अगदीं आजारी असे सुमारें वीस दिवस होऊन, इ० स० १८८४च्या मार्च महिन्याच्या एकुणिसाव्या तारखेस दुपारीं एक वाजतां पुणें येथें मरण पावले. हें वर्तमान समज-लें तेव्हां महाराष्ट्रांतल्या सगळ्या लोकांस फार दुःख झालें, आणि असें वाटलें कीं, आज आपली मोठी हानि झाली. आणि खरोखर, नानांच्या मरणानें आमच्या राष्ट्राची जी हानि झाली आहे, ती कधीं भरून यावयाची नाहीं.

ते उत्तम गणिती होते; एवढेंच केवळ नव्हे, तर उ-त्तम शिक्षकही होते. विद्यार्थ्यांच्या मनांत काठिण विषय सुलभ रीतीनें कसा बिंबवावा, ही कला त्यांस उत्तम साधली होती. आणखी त्यांच्या शिकविण्यामध्यें असा कांहीं एक प्रकारचा आनंद असे कीं, त्यांनीं किती वेळ

शिकविलें, तरी विद्यार्थ्यांस त्या विषयाचा कंटाळा येत नसे.

नानांस एवढें ज्ञान, एवढी संपत्ति, आणि एवढा अधिकार असून, हा लहान आणि हा मोठा, हा भेद त्यांच्याजवळ मुळींच नव्हता. ते स्वभावानें एकाद्या लहान मुलाप्रमाणें अगदीं साधे असत; आणि, निरंतर आनंदवृत्ति राहून, आपला काल विद्याव्यासंगांत आणि परोपकारांत घालवीत असत. अशी त्यांची वृति होती; तेव्हां आबालवृद्ध त्यांस भजत होते, ह्यांत कांहीं नवल नाहीं.

आपल्या उद्योगानें विद्वान् कसें व्हावें, लोकप्रीति कशी संपादावी, आयुष्य कसें घालवावें, आणि हें जग सोडून गेल्यावर मागें जनांनीं गुण गाऊन हळहळावें असें कसें वर्तावें, हें नानांनीं फार उत्तम प्रकारें दाखविलें आहे. हा किस्सा फार उत्तम आहे. हा वळवून आमच्या होतकरू मंडळीनें आपल्या जिण्याचें सार्थक्य करावें.

नानांच्या कुटुंबांतल्या मनुष्यांच्या दुःखित अंतःकरणांचें सांत्वन परमेश्वर करो; आणि नानांच्या जीवात्म्यास तो निरंतर शांति देवो.

---

## मी करितों तें सगळें माझ्यासाठीं.

### आर्या.

देवानें मज न कधीं विसरावें म्हणुनि मी तया नाहीं
पळ एकही विसरलों यामध्यें नवल तें नसे कांहीं. १.
संकट येतां मजला साह्य करावें यथाबल जनांहीं
उपकार म्हणुनि केले यामध्यें नवल तें नसें कांहीं. २.
व्हावा संतोष मला लोकांच्या सत्य मधुर वचनांहीं
म्हणुनि तसें मी वदलों यामध्यें नवल तें नसे कांहीं. ३.

वनितासुतनिर्वाहा-स्तव कष्टें हिंडला दिशा दाही
तें संसारसुखास्तव यामध्यें नवल तें नसे कांहीं. ४.
सुखभोगीं न खरचिलें धन दशकांहीं कुठून शतकांहीं
तें वित्तसंग्रहास्तव यामध्यें नवल तें नसे कांहीं. ५.
जनसंतर्पण केलें कीं गावें यश मदीय लोकांहीं
हें स्वार्थबुद्धिकारण यामध्यें नवल तें नसे कांहीं. ६.
बहु दानधर्म केला स्वर्गसुखप्राप्तिहेतु हा पाहीं
हें स्वहित म्हणुनि वाटे यामध्यें नवल तें नसे कांहीं. ७.
झालें मज पाहुनियां सुख चित्तीं मत्कलत्रतोकांचें
यास्तव तयां सुखविलें यामध्येंही नसे नवल साचें. ८.
ह्यावरुनि पहा जें जें मीं केलें सर्व तें स्वतांसाठीं
मग चांगलेपणाची कशी करूं मी उगाच हाकाटी. ९.
कर्तव्यकर्मदीपक सुखप्रकाश स्वयंभु जाणावा
लाविलियावर दीपक उजेड लागेल काय आणावा. १०.

---

## खंती नको आणि गर्वही नको.

आपणांस गरीबी नको असते, तरी येते; दुखणें नको असतें, तरी येतें; आणि, म्हातारपण नको असतें, तरी येतें. त्याप्रमाणेंच, नेपोलियन बोनापार्टासारखे धूर्त, साहसी, आणि उद्योगी पुरुष, विपत्काल टाळण्याकरितां भगीरथ प्रयत्न करीत असतां, तो त्यांस गांठितो. आणखी ज्या मनुष्यास जें दुःख कधीं होण्याचा संभव नसतो, त्यास तें भोगावें लागतें. त्याप्रमाणेंच असेंही आढळून येतें कीं, मनुष्यास ज्या कितीएक सुखावह गोष्टी कधीं जन्मांत मिळण्याची आशा नसते, त्या वस्तु, त्यास, अगदीं प्रयत्न न करितां, आपोआप प्राप्त होतात. राजा निपुत्रिक होऊन मरण पावला म्हणजे त्याच्या

वंशांतल्या एकाद्या गरीब मुलास, केवळ कुलसंबंधानें त्याच्या गादीवर बसवितात, हें त्याचें उत्तम उदाहरण आहे. ह्यावरून असें सहज मनांत येतें कीं, मनुष्य हा प्राणी अगदीं पराधीन आहे; ह्मणजे, कालदेशवर्तमानाच्या अनुरोधानें ज्या गोष्टी घडून येतात, त्यांप्रमाणें त्याला बरी किंवा वाईट स्थिति प्राप्त होते.

होय. ही गोष्ट खरी आहे. तरी केवळ तेवढीच एक खरी आहे, असें नाहीं. दुसरी ही एक गोष्ट तितकीच खरी आहे. ती लक्षांत ठेविली पाहिजे. ती ही कीं, गाडी एका चाकानें चालत नसते; तिला दोन चाकें लागतात. त्यांत दोहोंचीही आवश्यकता एकसारखी असते; ह्मणजे, त्यांत डावें उजवें कांहीं नसतें. त्याप्रमाणें, कालदेशवर्तमानाचा योग जसा मनुष्याच्या सुखास किंवा दुःखास कारणीभूत होतो, तसा त्याचा उद्योग किंवा आळसही त्याच्या सुखदुःखास कारणीभूत होतो. नुसत्या कालदेशवर्तमानाच्या योगाची वाट पहात जर नेपोलियन एकाद्या ठिकाणीं स्वस्थ बसून राहिला असता, तर तो बादशहा खचीत झाला नसता. आणखी त्याच्या उलट असें पहा कीं, रंकत्व आपणास न यावें, ह्मणून त्यानें आपल्या उद्योगाची जरी अगदीं पराकाष्ठा करून पाहिली, तरी, तें त्यास यावयास चुकलें नाहीं.

सारांश, मनुष्य हा प्राणी उद्योग आणि कालदेशवर्तमान ह्या दोन अनादि पुरुषांच्या हातीं सांपडलेला चेंडू आहे. सामर्थ्याच्या मानानें ते दोघे सारखे आहेत. एकादा मनुष्य ह्याच्या हातीं पडतो, एकादा त्याच्या हातीं पडतो. त्याविषयीं कांहीं नेम नाहीं. आणि त्याकडून त्या-

ला जसा वेग मिळतो, तसा तो थोडा उंच किंवा फार उंच जातो; आणि त्याप्रमाणें जनांत त्याला लहान किंवा थोर मानितात. त्यांत स्वतः मनुष्याचें कर्तृत्व ह्मटलें तर कांहींच नसतें. मग, त्या चेंडूनें, थोडा उंच गेल्याबद्दल खंती, किंवा फार उंच गेल्याबद्दल गर्व तो कशाकरितां करावा?

करवेल तितका चांगला उद्योग करावा, आणि, काळदेशवर्तमानाचा जो योग येईल, त्यास सादर असावें, तेवढेंच कायतें माणसाचें कर्तव्य आहे. तेवढें करावें ह्मणजे झालें.

---

## सृष्टि हें पुस्तक; त्याचा अभ्यास.

इंग्लंडांत इलिझाबेथ राणीच्या कारकीर्दींत लार्ड बेकन ह्या नांवाचा एक मोठा तत्त्वज्ञानी होऊन गेला. त्याच्या ज्ञानाच्या विशालत्वावरून त्यास "अर्वाचीन तत्त्वज्ञानाचा पिता" असें ह्मणतात. त्याचे ग्रंथ सर्वलोकमान्य आहेत. त्यांत त्यानें एके ठिकाणीं असें लिहिलें आहे कीं, "विश्व हें ईश्वरकृत पुस्तक आहे; तें वाचायास शिकून त्याविषयीं विचार करावा." होय. तें खरें आहे. तें पुस्तक अतिशयित मोठें आहे. हें जग निर्माण झाल्यापासून आज सहस्रावधि वर्षांत, जीं कोट्यावधि लहानमोठीं माणसें होऊन गेलीं, त्या सर्वांनीं, तें वाचण्याचे प्रयत्न केले. परंतु, त्यांचें सर्वांचें मिळून जें एकंदर वाचणें झालें आहे, तें इतकें अल्प आहे कीं, हें सगळें विश्व जर दहा कोटि भारतांएवढें धरिलें, तर, त्यांतलें एक अक्षर तरी पुरतेंसें

त्यांच्या ओळखीचें झालें असेल कीं नसेल, ह्याचा मोठा संशय आहे! हें प्राप्त ज्ञान जरी इतकें अल्प आहें, तरी, ह्या जगामध्यें मनुष्यांस सुख ह्मणून जें कांहीं होत आहे, तें त्याचें फल होय. वाफेच्या आंगच्या विशेष धर्मांचें ज्ञान, वाफेचीं यंत्रें चालविण्यास उपयोगीं पडलें आहे; विजेच्या आंगच्या विशेष धर्मांचें ज्ञान, तारायंत्रें चालविण्यास उपयोगीं पडलें आहे; आणि पदार्थांच्या आंगच्या विशेष धर्मांचें ज्ञान, वैद्यविद्येचा प्रसार होण्यास उपयोगीं पडलें आहे. ह्यावरून आमच्या ह्मणण्याची सत्यता लक्षांत येईल. हे विशेष धर्म बरोबर कळण्यास, ह्मणजे त्या शास्त्रांत प्रवेश होण्यास, पदार्थांचे सामान्य धर्म, ह्मणजे जे धर्म सर्व पदार्थांत निरंतर असतात, ते कळले पाहिजेत. ते समजून घेण्यास लागणें हा सृष्टिग्रंथ वाचायाच्या उद्योगाचा ओनामा होय.

---

## सर्व पदार्थांत निरंतर असतात असे धर्म.

अवलोकन करून आणि प्रतीति पाहून विद्वान् पुरुषांनीं असें सिद्ध केलें आहे कीं, ह्या विश्वामध्यें जितके ह्मणून पदार्थ आहेत, त्या सर्वांमध्यें असे कितीएक धर्म आहेत कीं, ते त्यांच्या ठायीं अगदीं निरंतर असतात; ह्मणजे, त्यांच्या स्थितींत कसाही फेरफार झाला, तरी, ते त्यांच्यांतून ढळत नाहींत. त्यांतले कांहीं येणेंप्रमाणें:—

**जोंपर्यंत एका जागीं एक पदार्थ असतो, तोंपर्यं दुसरा पदार्थ त्या जागीं यावयाचा नाहीं.**—पाण्यानें पूर्ण भरलेल्या पंचपात्रींत बोट बुडविलें, तर, बोट राहाण्यास पाहिजे, एवढ्या जागेंतलें पाणी बाहेर पडतें.

**सर्व पदार्थांस परिमाण असतें; ह्मणजे लांबी, रुंदी आणि जाडी असते.**—ह्याचाच अर्थ त्यांस कसा तरी आकार असतो. पाण्यासारख्या पदार्थाला परिमाण आणि आकार कोठला, असें मनांत येतें. परंतु, तेंच पाणी थिजून त्याचा गठ्ठा बनतो, तेव्हां ही शंका नाहींशी होते.

**सगळे पदार्थ अतिशयित बारीक कण एकत्र मिळून झालेले आहेत.**—ते किती बारीक, ह्याची कल्पना देखील बरोबर करितां यावयाची नाहीं. कितीएक प्राणी इतके लहान आहेत कीं, ते शेंकडों जेव्हां एकत्र करून ठेवावे, तेव्हां त्यांची एकंदर रास रेतीच्या लहानशा कणाएवढी होते! पदार्थाचा जो वास यतो, ते सगळे त्याचे कण असतात. एक पाव गुंज कस्तूरी एकाद्या खोलींत ठेविली असतां, त्या खोलींत तिचा घमघमाट वर्षोंगणती जरी चालला, तरी, त्या कस्तूरीच्या वजनांतला कमीपणा मनुष्याच्या लक्षांत येत नाहीं. ह्यावरून, ते वासाचे कण किती सूक्ष्म असावे बरें!

**पदार्थाला स्वतः हालतां येत नाहीं; आणि थांबतांही येत नाहीं.**—खेळते वेळीं जो चेंडू भिर्रकर जाऊं लागतो, त्याला गति तुमच्या हातापासून प्राप्त होते; आणि, अशी गति प्राप्त झाल्यावर, कांहीं वेळानें तो जो थांबतो, तो आपोआप थांबत नाहीं. तर, त्याला पुढें जाण्यास हवेंतून घुसत जावें लागतें, त्या हवेशीं त्याचें जें घर्षण होतें, त्याच्या योगानें तो थांबतो; आणखी, त्याला दुसरेंही एक मोठें कारण आहे. तें हें कीं,

**सगळे लहान मोठे पदार्थ, आपापल्या शक्तीप-**

माणें, एकमेकांस आपापणांकडे ओढीत असतात.— त्या नियमानें पृथ्वी त्या चेंडूला आपणाकडे ओढिते. सर ऐझाक न्यूटन आपल्या बागेंत बसला असतां, एक फल झाडावरून तुटून खालीं पडतांना त्यानें पाहिलें. तेव्हां त्याच्या मनांत असें आलें कीं, ह्या फळास जाण्यास वर आणि आजूबाजूस पुष्कळ जागा असून, तें खालीं जमिनीकडेच कां गेलें? त्यावरून त्यानें हा नियम शोधून काढून सिद्ध केला कीं, सगळे पदार्थ एकमेकांस नेहमीं आपणांकडे ओढीत असतात.

---

## चंद्र पळतो कीं ढग पळतात?

हा संशय रात्रीं आकाशाकडे पाहात असतां पुष्कळ मुलांस येतो; आणि त्याविषयीं कधीं कधीं ते वाद करूं लागतात. फ्रान्स देशामध्यें, इ० स० च्या १७ व्या शतकांत, पीटर ग्यासेंडी ह्मणून एक मोठा नामांकित ज्योतिषी होऊन गेला. तो लहानपणीं आपल्या बरोबरीच्या सोबत्यांबरोबर पौर्णिमेच्या रात्रीं बाहेर फिरत असतां, हा वाद त्यांच्यामध्यें उत्पन्न झाला. पीटर ग्यासेंडी ह्याचें ह्मणणें असें पडलें कीं, चंद्र स्थिर असून ढग त्यावरून पळत आहेत; आणि त्याच्या मित्रांचा अभिप्राय असा होता कीं, ढगांच्या पलीकडून चंद्र पळत आहे. त्यांची समजूत करण्यास पीटर ग्यासेंडी ह्यानें पुष्कळ प्रयत्न केले; परंतु, ते सगळे व्यर्थ गेले. ते आपला दुराग्रह सोडीनात. तेव्हां, त्यानें कांहीं वेळ स्तब्धपणें विचार करून त्या सर्वांस एका मोठ्या वृक्षाखालीं नेलें; आणि त्याच्या जवळजवळच्या दोन

फांद्यांच्या मधून टक लावून चंद्राकडे पाहायास त्यांस सांगितलें. त्याप्रमाणें त्यांनीं अर्ध घटिकापर्यंत पाहिल्यावर त्यांस असें स्पष्ट दिसून आलें कीं, चंद्र हा आपल्या ठिकाणीं स्थिर असून, ढग हे त्याजवरून मोठ्या वेगानें वाहात जात होते. ह्मणजे, तो चंद्र त्या फांद्यांच्या मध्यें जशाचा तसाच असून, त्यांच्यामध्यें नवनवे ढग येऊन जातांना त्यांच्या दृष्टीस पडले. तेव्हां, पीटर ग्यासेंडी ह्याचें ह्मणणें त्यांस पटलें. आणि चंद्र पळत नाहीं, तर ढग पळत आहेत, असें त्यांनीं कबूल केलें.

युरोपांतल्या ज्योतिष्यांमध्यें ग्यालिलियोच्या खालोखाल पीटर ग्यासेंडी ह्याची योग्यता मानितात. पीटर ग्यासेंडी हा इ० स० १७५५ त त्रेसष्ट वर्षांचा होऊन मरण पावला.

---

## स्वदेशाभिमान हें उत्तम मलम आहे.

अमेरिकेंत जाऊन राहिलेले इंग्लिश लोक आणि इंग्लंडांतले इंग्लिश लोक ह्यांचें वैर माजून, उभयपक्षांचीं युद्धें चाललीं; आणि हरप्रयत्नानें, इंग्लंडांतल्या इंग्लिशांच्या अधिकाराखालीं न राहतां, अगदीं स्वतंत्र व्हावयाचें, असा निश्चय अमेरिकेंतल्या लोकांनीं केला. तेव्हां त्यांजकडे युद्धाची तयारी इंग्लंडांतल्या लोकांच्या तयारीसारखी नव्हती, आणि लोकही फार कमी होते. तरी, त्यांच्या अंतःकरणांत आवेश आणि दृढनिश्चय हे अगदीं परिपूर्ण अवतरले होते. त्यांच्या योगानें, त्यांजकडे जें कांहीं उणें होतें, तें पुरें होऊन शेवटीं त्यांचा मनोरथ सिद्धीस गेला. त्या आवेशाचें आणि दृढ निश्चयाचें एक उदाहरण येथें सांगतों.

स्टोनो ह्मणून एक ठिकाण अमेरिकेमध्यें आहे. तेथें उभयपक्षांचें तुमुल युद्ध झालें. त्या प्रसंगीं कर्नल ओवेन राबर्टस ह्या नांवाचा एक अमेरिकन सरदार गोळी लागून पडला, आणि तिनें त्याचा अंत लवकर होणार असें दिसलें. तेव्हां त्याचा मुलगा, त्याच समरांगणावर दुसरीकडे कोठें लढत होता, त्याला हें वर्तमान कळल्याबराबर, तो आपल्या बापाच्या समाचारास धांवत धांवत त्याच्या जवळ आला; आणि, त्याची ती अत्यावस्था पाहून त्याच्या डोळ्यांतून आश्रुधारा वाहूं लागल्या. त्या प्रसंगीं बापानें आपल्या मुलाकडे वळून मोठ्या धैर्यानें आणि गांभीर्यानें त्यास ह्मटलें, "बाबारे, तूं मला येऊन भेटलास येणेंकरून मला फार संतोष झाला आहे. ही पहा माझी तरवार. ही अद्यापपर्यंत पापकर्मानें कधींही विटाळलेली नाहीं. ही तूं घे, आणि तुझ्या देशाची स्वतंत्रता भयांतून मुक्त होईपर्यंत हिला विसांवा देऊं नको. परमेश्वर तुझें कल्याण करो. जा आतां तूं आपल्या कामावर."

ओवेन राबर्टस ह्याला एवढी मोठी जखम लागली होती, ती, हें बोलतांना, बरी झाली होती काय? होय. अगदीं बरी झाली होती. ती स्वदेशाभिमान ह्या मलमानें बरी झाली होती. !

---

## साधूंचें मुख्य लक्षण.

सुखदुःखप्राप्तीनें कवि हर्षविषादलेश न धरीती
बर्षावर्षीं जोवें न वृद्धिक्षय सिंधु हेचि बुधरीती. १.

मोरोपंत.

---

# बालबोध.



## अकबर बादशहा.



अल्प वयामध्यें महत्कार्यास हात घालून, तें उत्तम प्रकारें सिद्धीस नेल्याची अनुपम कीर्ति ज्या विशालबुद्धि पुरुषांनीं अर्वाचीन कालीं विपुल संपादिली आहे, त्यांतल्या उत्तमांतल्या उत्तमांत अकबर बादशहा हा प्रमुख होऊन गेला, असें केवळ आह्मीच ह्मणतों असें नव्हे; तर, परकीय राष्ट्रांतल्या मनुष्यांची प्रशंसा करणें हें ज्यांस महत्संकट वाटतें, त्या युरोपियन शोधकांनींही त्याविषयीं असेंच ह्मटलें आहे. त्याचें चरित्र आह्मी येथें सादर करितों.

दिल्लीचा पहिला मोंगल बादशहा बाबर हा इ० स० १५३० ह्या वर्षी मरण पावल्यावर, त्याचा मुलगा

हुमायून हा त्याच्या गादीवर बसला. त्यास कांहीं दिवस लोटल्यानंतर, बंगाल्याचा सुभेदार शीरशहा, जातीचा अफगाण होता, तो त्यास शत्रु उत्पन्न झाला. त्यानें हुमायुनाचा पराभव इतका केला कीं, त्यास देशत्याग करणें भाग पडलें. तो, वनवासी होऊन, कुटुंबासह इराणाकडे चालला असतां, वाटेनें सिंध प्रांतांत, अमरकोट येथें, त्याची पत्नी प्रसूत होऊन, तिला पुत्र झाला. तेव्हां त्या अरण्यवासांत साखर कोठची ! तरी, हुमायुनाच्या संग्रहीं कस्तूरीची एक जुनी कुपी होती. ती फोडून, त्यानें तिचा एक एक तुकडा आपल्या बरोबरच्या प्रवाशांस वांटला, आणि ह्मटलें कीं, "देव करो, आणि कस्तूरीच्या ह्या सुगंधाप्रमाणें माझ्या ह्या पुत्राची कीर्ति पसरो !" हें अकबराचें जन्मवृत्त होय.

पुढें बारा वर्षेपर्यंत हुमायून तिकडेसच होता. इतक्यांत, इकडे दिल्लीच्या गादीवर शीरशहाचा नातू असतां, त्याच्या राज्यांत बंडावा उठला; ती संधि साधून, हुमायून आपल्या पुत्रासहवर्तमान कांहीं सैन्य बरोबर घेऊन हिंदुस्थानाकडे आला, आणि त्यानें, पाणिपत येथें दिल्लीवाल्याच्या सैन्याचा अगदीं पराभव केला. त्या प्रसंगीं अकबर जरी केवळ बारा वर्षांचा होता, तरी त्यानें फार चांगली तरवारबहादुरी दाखविली. नंतर, हुमायून पुनः दिल्लीचा बादशहा झाला. हें वर्तमान इ० स० १५५६ त घडलें.

त्याच वर्षीं हुमायून मरण पावला, आणि त्याच्या गादीवर अकबर बसला. तेव्हां तो अवघा तेरा चौदा वर्षांचा होता. तो स्वभावतः मोठा तेजस्वी होता. त्याचा

पिढीजाद दिवाण बहिरामखान, हा त्याला एकाद्या अज्ञान मुलासारखें लेखूं लागला, हें त्याला न सोसून, त्यानें त्याला दिवाणगिरीवरून काढून टाकिलें, आणि सगळ्या राज्याचा कारभार आपल्या हातीं घेतला. त्याच्या राज्यांत कितीएक बंडें उठलीं, तीं त्यानें मोठ्या शौर्यानें मोडून टाकिलीं, आणि आपला दरारा सभोंवतालच्या राष्ट्रांवर बसविला. त्यानें रजपूतस्थानाचा बराच भाग, गुजराथ, बंगाला, काश्मीर, सिंध, कंदाहार, आणि खानदेश हीं जिंकून घेऊन आपल्या राज्यांत सामील केलीं. रजपूत लोक फार खवळले होते, त्यांस आपले सोयरे करून, युक्तीच्या पोटीं त्यानें वश करून घेतलें, आणि कलह मिटविला. त्याप्रमाणेंच हिंदु लोकांवरचे कर माफ करून, आणि त्यांच्यातल्या हुशार पुरुषांस राज्यांतलीं मोठमोठीं कामें देऊन, त्यांस खूष ठेविलें. तोडरमल्ल हा त्याच्या दरबारचा फडणीस होता. त्याच्या सैन्यांत मनसबदार ह्मणजे घोडेस्वारांतले अमलदार एकंदर ४१६ होते; त्यांत ५१ हिंदु होते. एकंदरींत, जिंकलेले लोक जे आहेत, त्यांस तरवारीच्या धारेखालीं ठेवण्यापेक्षां, मुलांप्रमाणें ममतेनें वागविणें हें आपणास विशेष हितावह आहे, हें त्याला चांगलें कळत होतें, असें दिसतें. हें अद्याप चांगल्याचांगल्यांस कळत नाहीं ! उघड कशाला बोलावें !

अकबरानें आपल्या मुलुखाचे वेगळे वेगळे परगणे करून, त्यांजवर चांगले कामदार नेमून, आणि त्यांस चांगले कायदे घालून देऊन, राज्याची व्यवस्था फार उत्तम रीतीनें चालविली. तेणेंकरून प्रजेस फार सुख

झालें. त्यानें जमिनीची मोजणी करवून, शेतकऱ्यांस दहा दहा वर्षांचे कौल ठरवून दिले. त्याच्या राज्यांत, शेताच्या उत्पन्नाचा तिसरा हिस्सा सरकार सारा ह्मणून घेत असत. त्याचें जमीनबाबींचें उत्पन्न १७,००,००,००० रुपये होतें.

हा बादशहा पन्नास वर्षें राज्योपभोग घेऊन, इ० स० १६०५ ह्या वर्षीं आग्रा येथें मरण पावला. तेव्हां त्याचें वय त्रेसष्ट वर्षांचें होतें. तो लहानपणापासून मोठा सहनशील, जबरदस्त उद्योगी, आपल्या प्रजेस सुख देण्याविषयीं परम दक्ष, न्यायी, धार्मिक आणि विद्येचा भोक्ता असा होता. आपणास माहिती करून घेण्याकरितां त्यानें हिंदूंच्या संस्कृत धर्मपुस्तकांचें आणि पुराणांचें भाषांतर फारशी भाषेंत करविलें होतें. दिव्य करून वाद मिटवणें, आणि माणसांचे बळी देणें, हीं त्यानें बंद केलीं; आणि हिंदु विधवांनीं पुनर्विवाह केल्यास तो कायदेशीर समजावा, असें केलें. असें ह्याचें चरित्र गावें तितकें थोडेंच वाटतें. पंतांनीं ह्मटलें आहेः—

"सत्पुरुषकथा अद्भुत रसदा म्हणतों इलाच सुरभी मी."

खरें आहे. आमच्या राष्ट्राच्या इतिहासास अकबर हें एक अमोलिक भूषण आहे.

---

## जिव्हेचा महिमा.

### साक्या

जिव्हे सखये सकलांमध्यें तूं दिसतेस शहाणी
प्रतापमहिमा तुझा वर्णितां थकली कविवरवाणी. १.
मधुर कटु तुला कळतें तैसें अन्यां नकळे कांहीं
ग्राह्याग्राह्यपरीक्षक तुजसम दुसरें कोणी नाहीं. २.

देह तुझा लघु नाजुक करिसी वास सदां एकांतीं
स्त्रीजातीला बहु शोभे हें कोणास नसे भ्रांती. ३.
परंतु जग हें स्वाधीन तुझ्या मजला गमतें आहे
नाहीं न म्हणे विचार थोडा आधीं करोनि पाहें. ४.
तुझ्या प्रभावें वाल्या कोळी वाल्मीकि ऋषी झाला
तसा सहस्रावधी इतर जन मुक्तिपदास मिळाला. ५.
निज माधुर्यें शत्रूलाही परम मित्र करतोस
कोण न वाणी विषास करिते अमृत तया रीतीस. ६.
तद्विपरीत पहा–रामाला वनवास तुझ्या पायीं
कौरवपांडव ह्यांच्या कलहा कारण तुम्हीच बाई. ७.
प्रभुनारायणराव पेशवे ह्यांस तुम्हीं मारविलें
सुमेरसिंगाकडुनि पाहिजे तें सगळें सांगविलें. ८.
पदर पसरितों हात जोडितों पायां पडतों माते
कृपा करावी मजवर ऐशी कीं व्हावें सुख मातें. ९.
सत्य मधुर भाषणा करावें सर्वांसीं सुखवावें
परमेशाची लीला गाउनि कालक्रमण करावें. १०.
असत्य वाचा कीं परनिंदा ह्यांस तुवां न शिवावें
तसें न कोणा कधीं आपुले वचनांहीं दुखवावें. ११.
दे मज हें मग नाहीं मजला स्वर्गसुखाची परवा
संतमंडळासही वाटतो विचार हा बहु बरवा. १२.

---

## वेळच्यावेळीं काम करणें.

मनुष्यांस सुख प्राप्त होण्यास जीं अनेक साधनें अवश्यक आहेत, त्यांमध्यें वेळच्या वेळीं काम करणें ह्याची गणना आहे. सृष्टीमध्यें जे व्यवहार चालतात, त्यांतही वेळच्या वेळीं कार्यें घडण्याचा प्रकार पुष्कळ दृष्टीस पडतो. सूर्य उगवणें, सूर्य मावळणें, चंद्र उगवणें, चंद्र मावळणें, भरती येणें, ओहोट वळणें, ऋतु बदलणें,

इत्यादि सर्व गोष्टी नियमित वेळीं घडतात. सूर्य उगवण्याच्या आणि मावळण्याच्या वेळांच्या नियमितपणावर निःशंकपणें अवलंबून राहून, आपलीं कोणतीं कामें दिवसास करावयाचीं, आणि कोणतीं रात्रीं करावयाचीं, ह्यांची बरोबर योजना मनुष्यें करितात; चंद्रोदयाच्या नियमितपणाच्या धोरणावर प्रवासी जन आपला मार्गक्रमणाचा आणि मुक्कामाचा बेत ठरवितात; भरतीओहोटीच्या नियमित कालावर पूर्ण भरंवसा ठेवून, नावाडी लोक, गलबतें बंदरांत केव्हां नांगरायाचीं, आणि तेथून केव्हां हांकावयाचीं, हें योजून ठेवितात; उन्हाळ्याच्या पुढें पावसाळा खचीत यावयाचा, असें समजून, शेतकरी लोक आपल्या शेतांच्या नांगरणीची आणि पेरणीची तरतूद करावयास लागतात; अशा प्रकारें ह्या नियमितपणाच्या योगानें मनुष्यांस आपापलीं कामें यथाकाळीं करण्यास फार मोठें साह्य होतें; आणि तेणेंकरून त्यांस फार सुख होतें. ह्मणून ह्या नियमितपणाच्या योजनेबद्दल आपण सर्व मनुष्यांनीं परमेश्वराचे आभार मानावे हें योग्य आहे.

सृष्टिक्रमांतला हा नियमितपणा जसा मनुष्यांच्या सुखास उपयोगीं पडतो, तसा त्यांच्या कामांतला नियमितपणा स्वतः त्यांच्या सुखाला, आणि त्यांच्या संबंधाच्या सगळ्या माणसांच्या सुखाला उपयोगीं पडतो. हें जाणून, आजपर्यंत जे थोर पुरुष होऊन गेले, ते बहुतेक आपलीं कामें वेळच्या वेळीं करण्याविषयीं फार जपत असत. त्यांचीं उदाहरणें इतिहासांत पुष्कळ आढळतात.

इंग्लंडांतला नामांकित योद्धा लार्ड नेलसन हा असें

ह्मणत असे ह्मणून सांगतात कीं, "मला जें एवढें यश प्राप्त झालें आहे, त्याचें मूळ बीज एवढेंच आहे कीं, कोणत्याही कामांत आधीं पावतास माझी तयारी असते."

फ्रान्सदेशाचा प्रख्यात राजा सोळावा लुई हा जरी स्वतः फार जपून वागणारा नव्हता, तरी तो उघड ह्मणत असे कीं, "आपलीं कामें वेळच्या वेळीं करणें, हें राजांच्या सभ्यपणाचें मुख्य लक्षण आहे."

ज्या पराक्रमी पुरुषानें स्वसामर्थ्यानें अमेरिकेंतल्या इंग्लिश संस्थानांस इ० स० १७७६ त स्वातंत्र्य दिलें, तो जार्ज वाशिंग्टन आपलीं सगळीं कामें इतकीं वेळच्या वेळेस करी कीं, त्याच्या जाण्यायेण्याकडे लक्ष ठेवून लोक आपलीं घड्याळें बरोबर लावीत असत.

अशीं आणखी पुष्कळ उदाहरणें सांगतां येतील. आपल्या आणि इतर सर्व लोकांच्या वैद्यशास्त्रांत सांगितलें आहे कीं, प्रकृति चांगली राहाण्यास मनुष्यानें आपलें खाणें, पिणें, आणि निजणें, हीं नियमित वेळीं होत, ह्याविषयीं जपलें पाहिजे. आणि, तें सर्वांच्या अनुभवास आलेलें आहे.

त्याप्रमाणेंच गाडी किंवा गलबत, नियमित ठिकाणाहून नियमित वेळीं निघावें, नियमित स्थळीं नियमित वेळीं पोंचावें, आणि त्या ठिकाणचीं आपलीं सगळीं कामें, मध्यें कांहीं एक व्यत्यय न येतां, सुरळितपणें व्हावीं, हें किती सोईचें आणि सुखाचें आहे, तें बरोबर लक्षांत येण्यास, त्यांत नानाप्रकारचीं विघ्नें उत्पन्न होऊन त्यांपासून जे हाल होतात, ते सगळे मनांत आणिले

पाहिजेत. फार कशाला, आपण डांकेंत पत्र टाकायास गेलों, आणि त्यास जरा उशीर झाल्यामुळें जर डांक आधीं रवाना झाली असती, तर आपणांस वाईट वाटतें; मग गाडी किंवा आगबोट चुकल्यावर फार वाईट वाटावें, ह्यांत काय नवल आहे.

एकंदरींत, आपलीं कामें वेळच्या वेळीं केल्यानें मनुष्यांस फार सुख होतें. ह्यास्तव तीं तशा प्रकारें करण्याविषयीं झटावें, हा सर्व माणसांचा धर्म होय.

---

## पदार्थांच्या मुख्य जाति अवघ्या तीन.

आपल्या भोंवतालच्या पदार्थांकडे पहावें, आणि त्याविषयीं विचार करावा, तेव्हां असें मनांत येतें कीं, इतक्यांची माहिती करून घेण्यास आपणांस सामर्थ्य कोठून असणार, आणि आपलें आयुष्य कसें पुरणार ! आणि तें खरें आहे. बागेंतल्या एका एका झाडाकडे पाहिलें, ह्मणजे त्याविषयींही असेंच वाटणार आहे. परंतु त्यांत असें पहावें कीं, बागेंत झाडें जरी सहस्रावधि आहेत. तरी त्याच्या जाति कांहीं सहस्रावधि नाहींत; त्या थोड्याच आहेत त्याप्रमाणें, सृष्टींतले आपणांभोंवतालचे पदार्थ जरी लक्षावधिच काय पण कोट्यवधि आहेत, तरी, त्यांच्या जाति पाहिल्या तर इतक्या दिसावयाच्या नाहींत; थोड्या दिसतील; आणि त्या जातींच्या गुणधर्मांचें ज्ञान करून घेतलें ह्मणजे, त्या सगळ्या पदार्थांचें ज्ञान करून घेतल्यासारखें होईल. त्याची योजना विद्वान पुरुषांनीं फार चांगली लावून ठेविली आहे. ती अशी:—

सर्व पदार्थ.—त्यांत मुख्य जाती तीन.

१. **प्राणी.**

२. **वनस्पति.**

३. **निर्जीव पदार्थ; दगड, माती इत्यादि; त्यांस खनिज असें कठिण नांव आहे.**

हें लक्षांत ठेवून, तुह्मी कोणत्याही पदार्थाकडे पहा, आणि विचार करा; तो ह्या तिहींपैकीं कोणत्या तरी एका जातींत आला पाहिजे; दुसरें गत्यंतर नाहीं. पागोटें घ्या; त्याचें सूत हें वनस्पतीपासून निघालेलें आहे; आणि त्याच्या जरीच्या पदरांतले धातूचे धागे ते खनिजापैकीं आहेत. बंडी घ्या; तिची बनात ही प्राण्यापासून निघाली आहे; कापसाच्या ज्या दोऱ्यांनीं ती शिवली आहे, ते दोरे वनस्पतीपासून झालेले आहेत; आणि तिला पितळेच्या गुंड्या लाविल्या आहेत, त्या धातूच्या, ह्मणजे खनिज पदार्थांपैकीं आहेत. असें सर्व पदार्थांविषयीं सांगतां येईल. ह्मणजे असें झालें कीं, कोणताही पदार्थ ह्या तिहींपैकीं कोणत्या तरी एका जातींतला ठरला पाहिजे.

पदार्थांच्या संख्यांचा अंत अजूनपर्यंत कधीं कोणास लागला नाहीं, आणि पुढें कधीं लागावयाचा नाहीं; तरी, जें काय दृष्टीस पडतें, त्यावरून असें वाटतें कीं, संख्येच्या मानानें निर्जीव ह्मणजे खनिज पदार्थांची संख्या सर्वांत मोठी असावी; तिच्या खालोखाल वनस्पतींची असावी; आणि तिच्या खालोखाल प्राण्यांची असावी. परंतु, योग्यतेच्या मानानें, आह्मी प्राण्यांची जाति श्रेष्ठ ह्मणतों, तिच्या खालोखाल वनस्पतींची जाति समजतों,

आणि तिच्या खालोखाल खनिजांची जात गणितों. सर्वांत उंची जात आह्मी प्राण्यांची समजतों, ह्यांत कांहीं नवल नाहीं; कां कीं, तींत आमचा स्वतःचा समावेश होतो; आणि आमच्या खालोखाल आधीं वनस्पतींस लेखितों, कांकीं, त्या आह्मांस फार उपयोगीं पडतात; आणि, तेव्हां अर्थातच खनिजांची पायरी तिसरी आली.

आणखी अशी व्यवस्था मनांत आणण्यास दुसरें एक कारण आहे. तें असें. ह्या पृथ्वीवर जितकीं धर्मशास्त्रें आहेत, त्यांतल्या बहुतेक सर्वांत असा एक अभिप्राय आढळतो कीं, हें सगळें जग परमेश्वरानें मनुष्याच्या सुखाकरितां निर्माण केलें आहे; त्यानें आपल्या बुद्धिसामर्थ्यानें त्याचा चांगला उपयोग करून घ्यावा. असें एकंदर सृष्टिरचनेवरूनही दिसतें खरें. तरी, उंदरांची सभा भरली ह्मणजे, ते कदाचित् असें ह्मणतील कीं मनुष्यें जीं हीं एवढालीं घरें बांधितात, तीं, आह्मी त्यांत बिळें करून रहावें ह्मणून; त्याप्रमाणेंच, उवा ह्मणतील कीं, मनुष्यांचीं डोकीं हीं आमच्या सुखाकरितां निर्माण केलीं आहेत; तर मग त्यांस आह्मीं माणसांनीं काय सरळ उत्तर द्यावें बरें! रागावून मारायास उठावें हेंच कीं नाहीं? पण तें उत्तर होणार नाहीं; ती दांडगाई होईल! सृष्ट पदार्थांच्या ह्या व्यवस्थेच्या संबंधानें बळी तो कान पिळी, असा न्याय दिसतो. खरोखर योजना काय असेल ती विश्वंभरास ठाऊक. त्याचा अतर्क्य महिमा पाहून, नम्र होउन, त्याच्या ज्या इच्छा दिसतात, त्यांप्रमाणें वागावें, एवढेंच काय तें आपलें मनुष्याचें कर्तव्य आहे. तें करावें ह्मणजे झालें.

## राजाला पाहून मला काय मिळणार ?

इंग्लंडचा राजा तिसरा जार्ज हा कोणे एके वेळीं देशामध्यें फिरायास निघाला; त्याचा मुकाम एका खेड्यांत पडला. तेव्हां आसपासचे सगळे लहानमोठे लोक त्यास पाहायास जाऊं लागले. तो राजा एके दिवशीं प्रातःकाळीं फिरत फिरत एकटाच एका कुरणामध्यें गेला; तेव्हां तेथें एक म्हातारी बाई एकटीच गवत कापीत असतां त्याच्या दृष्टीस पडली. तिला राजानें विचारिलें, "बाकीच्या तुझ्या सोबतिणी कोठें गेल्या, बाई ?"

**म्हातारी**–त्या राजा पहायाला गेल्या आहेत, दादा.

**राजा**–मग तूं नाहीं गेलीस राजा पहायाला ?

**म्हातारी**–त्याला पाहून मला काय मिळायाचें आहे? ज्या बाया त्याला पहायाला गेल्या आहेत, त्यांचा आजचा सगळा दिवस व्यर्थ गेला. त्यांना आज एक कवडी देखील मिळावयाची नाहीं. असें करून मी काय करूं? मी गरीब आहें, आणि मला पांच लहान लहान मुलें आहेत. त्यांना मला पोसायाला हवें. राजा थोर आहे खरा; पण त्याला पाहून मला काय मिळणार?

हें ऐकून राजास मोठें आश्चर्य वाटलें; आणि, त्यानें एक मोहोर त्या म्हाताऱ्या बाईच्या हातावर ठेवून तिला म्हटलें, "तुझ्या सोबतिणी राजा पहायास गेल्या आहेत, त्या परत आल्यावर तूं त्यांना सांग कीं, तुम्ही राजा पहायास गेलां होतां, पण राजा येथें मला भेटायास आला होता; त्यानें मला ही पहा एक मोहोर दिली आहे."

आपलीं अवश्यक कामें टाकून रिकामे तमाशे पहायास जाणाऱ्या माणसांनीं ह्या गोष्टीचा विचार करावा.

---

## वाऱ्याचा जोर मोजण्याची युक्ति.

बुद्धीचा अंकुर झांकत नाहीं. इ० स० १६५८ ह्या वर्षीं इंग्लंडांत फार मोठें वादळ झालें. तेव्हां सगळीं माणसें आपापल्या घरांत दारें लावून स्वस्थ बसलीं. परंतु एक मुलगा बाहेर आला, आणि मैदानांत उड्या मारून खेळूं लागला. त्यानें एकादा वारा पाठचा घेऊन उडी मारावी, आणि ती किती दूर जाते, ह्याची खूण ठेवावी; आणि पुनः वारा तोंडचा घेऊन उडी मारून, ती किती दूर जाते, ह्याची खूण ठेवावी; अशा प्रकारें करून त्या मुलाच्या मनांत वाऱ्याचा जोर मोजावयाचा होता. हा मुलगा न्यूटन होय. तो त्या वेळीं अवघा १६ वर्षांचा होता. तोच पुढें सर ऐझाक न्यूटन ह्मणून प्रसिद्धीस आला.

---

### प्रश्न.




त हा तलाव आहे; त्याच्या चार बाजूंस ० अशी खूण केली आहे, तेथें वाईट लोकांचीं घरें आहेत; आणि + अशी खूण केली आहे, तेथें चांगल्या लोकांचीं घरें आहेत. आतां, चांगल्या लोकांच्या मनांत असें आलें आहे कीं, वाईट लोकांच्या घरांस ढका न लावितां, अशी एक भिंत बांधावी कीं, तिच्या योगानें तळ्याशीं त्या वाईट लोकांचा संबंध न राहतां, आपणां सर्वांस त्याचा उपभोग घेतां यावा; तर, अशी भिंत कशी बांधावी?

---

# बालबोध.



## लार्डबेकन.



सांप्रतकाळीं विद्याचारसंपन्नतेच्या मार्गांत युरोपखंड सर्वांच्या पुढें आहे. त्यास इतकें पुढें सरण्यास ज्या तत्त्वज्ञान्यांचे परिश्रम उपयोगीं पडले, त्यांतल्या श्रेष्ठांत लार्ड बेकन ह्याची गणना करितात.

इंग्लंडांत इलिझाबेथ राणीच्या दरबारामध्यें, शिक्केदारीच्या कामावर, सर निकोलस बेकन ह्या नांवाचा एक मोठा श्रीमान्, संभावित आणि वजनदार गृहस्थ होता. त्यास इ० स० १५६१ ह्या वर्षीं एक मुलगा झाला. त्याचें नांव त्यानें फ्रान्सिस बेकन असें ठेविलें. हा फ्रान्सिस लहानपणीं मोठा चपळ, धीट आणि सुरेख मुलगा असून, तो आपल्या बापाबरोबर कधीं कधीं

दरबारांत जाई; तो राणीला फार आवडत असे; आणि ती त्याला, विनोदानें, छोटा शिक्केदार ह्मणत असे. फ्रान्सिस बेकन ह्यानें शाळेंत अभ्यास करून, लोकांत चांगली वाहवा मिळविली. पुढें तो पार्लमेंटाचा सभासद झाला, आणि सरकारी कामांवर वाढत वाढत जाऊन, शेवटीं मुख्य न्यायाधीश झाला. त्याचें नांव, ग्रंथांतून लार्ड बेकन असें प्रसिद्ध आहे.

लार्ड बेकन ह्याची जी एवढी कीर्ति अद्यापपर्यंत गाजत आहे, तीस सगळा पाया त्याचें तत्त्वज्ञान होय. तो फार खोल विचारी होता. विचार करण्याची एक नवीनच पद्धति त्यानें प्रचारांत आणिली. तिच्या योगानें ज्ञानाची वृद्धि फार झाली. ह्मणून ह्या पुरुषाला, "अर्वाचीन तत्त्वज्ञानाचा जनिता" असें ह्मणतात. तो सर्वांस असें सांगे कीं, "जुनीं पुस्तकें पुनः पुनः वाचण्यापासून कांहींएक उपयोग व्हावयाचा नाहीं. त्यांवरून नवीन अशी एक देखील गोष्ट तुह्मांला कळावयाची नाहीं. डोळे उघडा; काय दिसतें तें नीट पहा; आणि प्रयोगपूर्वक विचार करा. ह्मणजे तुह्मांला वस्तूचें सत्य स्वरूप समजेल; आणि तुमचें सर्वांचें ज्ञान निरंतर वाढत जाईल." ह्मणजे, त्याच्या सांगण्याचें मुख्य तात्पर्य एवढेंच असे कीं, प्रतीतिवरून नियम बसवावे; नियम खरे समजून प्रतीतीस तिकडे वळविण्याचा प्रयत्न करूं नये.

लार्ड बेकन ह्यानें अनेक ग्रंथ लिहिले. ते सगळे विद्वज्जनांस मान्य आहेत. त्याची लिहिण्याची शैली फार खोल, आणि थोडक्यांत पुष्कळ अर्थ यावा, अशी आहे, त्याच्या पांच ओळींत जे विचार असतात, ते स्पष्ट करून

सांगण्यास इतरांस पन्नास पृष्ठें सुद्धां पुरत नाहींत. आणखी त्याची मानसदृष्टि इतकी सूक्ष्म असे कीं, विचार करण्यास त्यानें कोणताही एकादा विषय पुढें घेतला ह्मणजे, त्याचें कोणतेंही अंग त्याच्या अवलोकनांत आल्यावांचून रहात नसे. हा गुण फार थोड्यांच्या ठायीं असतो. विद्येच्या संबंधानें लार्ड बेकन ह्याचें वचन आधारभूत दाखविल्यावर मान डोलवणार नाहीं, असा समंजस मनुष्य सहसा आढळावयाचा नाहीं. तत्त्वज्ञानविचारप्रकरणांत लार्ड बेकन ह्याचें नांव चिरकाल सन्मानित राहील.

हें लार्ड बेकनाच्या चरित्राचें एक अंग झालें. तें दाखवायास कांहीं अवघड वाटलें नाहीं. परंतु, दुसरें अंग दाखविण्यास फार वाईट वाटतें. परंतु, काय करावें ? चरित्र पुरतें केलें पाहिजे. लार्ड बेकन हा जरी एवढा तत्त्वज्ञानी होता, तरी, तो जबरदस्त लांचखाऊ, आणि अत्यंत कृतघ्न होता. लांच खाल्याच्या अपराधाबद्दल त्यास सरकारानें भला मोठा दंड केला, आणि कांहीं दिवस तुरुंगांतही टाकिलें होतें. आणखी, ज्याच्या आश्रयानें लार्ड बेकन हा उदयास आला, त्या पुरुषाचा समूळ नाश करण्यास भगीरथ प्रयत्न करून आपल्या नांवास त्यानें कालिमा लावून घेतली.

ज्या परमाणूंचा हिरा बनलेला असतो, त्याच परमाणूंचा कोळसा बनलेला असतो; आणि त्यांच्या योग्यतेंत जें एवढें अंतर पडतें, त्यास कारण त्या परमाणूंची भिन्न भिन्न रचना होय; असें विद्वान लोक आपणांस सांगतात. पण त्या वस्तु तरी दोन असतात. परंतु, लार्ड बेकन हा पुरुष एक असून, तत्त्ववेत्ता ह्मणून पाहिला

ह्मणजे सूर्यासारखा प्रकाशमान दिसतो; आणि न्यायाधीश किंवा गृहस्थ ह्मणून पाहिला ह्मणजे कोळशापेक्षांही काळा दिसतो. चमत्कार आहे !

लार्ड बेकन हा अलौकिक पुरुष इ० स० १६२६ ह्या वर्षीं मरण पावला.

---

## उद्यांचा काय नेम.

### श्लोक.

तुझीया मनीं चांगलें व्हावयाचें
तरी आज हो पर्व हें सोनियाचें
असे वागले मोठमोठे शहाणे
उद्यां काय होईल तें कोण जाणे. १.
धरित्रीवरी काल जीवंत ठेले
तयांतील पाहा किती आज मेले
तुला ही अवस्था नसे का वहाणें
उद्यां काय होईल तें कोण जाणे. २.
पुढें हें करूं तें करूं पुण्य साधूं
धनें मेळवूं मंदिरें थोर बांधूं
भ्रमीं वेड या शुद्ध आहे रहाणें
उद्यां काय होईल तें कोण जाणे. ३.
दरिद्री मुके आंधळे पाहतोसी
असे नेम का कीं तसा तूं न होसी
अकस्मात ये हें जिणें दीनवाणें
उद्यां काय होईल तें कोण जाणे. ४.
नसे आळसासारखा चोर लोकीं
अमोलीक आयुष्य तो चोरतो कीं
'उद्यां हो उद्यां' हे तयाचे बहाणे
उद्यां काय होईल तें कोण जाणे. ५.

म्हणोनी तुला वाटतें जें करावें
करायास तें आज बा लाग भावें
दुजा आजच्या सारखा वेळ नाहीं
विचारोनि चित्तीं खरें काय पाहीं. ६.

---

## दया.

परमेश्वराच्या ठायीं जे अनेक सद्गुण आहेत, त्यांमध्यें दया मुख्य होय; आणि त्याची भक्ति ह्या जगामध्यें जी इतकी चालली आहे, तीस कारण ती दया होय. ह्मणजे, आपण जरी इतकीं महापातकें करितों आहों, तरी, परमेश्वर दयासागर आहे, तो आपणांस आपल्या पापांची क्षमा करील, असा भरंवसा जनांस आहे, ह्मणूनच ते त्याची भक्ति करितात. परमेश्वर स्वतः दयासागर आहे; ह्मणून, दयाळू जन त्यास प्रिय होतात. "भूतांची दया हें भांडवल संतां" असें महाराजांनीं ह्मटलेंच आहे.

फ्रान्स देशाचा राजा; नववा लुई हा, कोणे एके वेळीं, आपल्या राणीसहवर्तमान आणि मुलांसहवर्तमान एका गलबतांत बसलेला असतां, त्याच्या खालच्या फळ्या एकाएकीं निखळून जाऊन, पाणी आंत भरूं लागलें आणि, ह्या संकटांतून आतां आपला प्राण वांचत नाहींत, असें सर्व माणसांस वाटलें. इतक्यांत, त्या गलबताच्या बरोबरचें एक लहान गलबत जवळ हांकीत आणून, कोणी एका सेवकानें राजास विनंति केली कीं, आपण आपल्या कुटुंबासह ह्या गलबतांत उतरून बसावें, ह्मणजे आपल्या जीवांस ढका लागावयाचा नाहीं. तें ऐकून, त्यानें आपल्या सेवकास ह्मटलें,

"अरे बाबा, इकडे पहा; माझा जीव जसा मला प्यारा आहे, तसे ह्या गलबतामध्यें मजबरोबर जे कोणी बसले आहेत, त्यांस त्यांचे जीव प्यारे आहेत. हें गलबत सोडून मी निघालों कीं ते लागलेच माझ्या मागोमाग त्या गलबतांत येतील; आणि तें गलबत फारच लहान आहे; त्यामुळें सर्वांसच मरणाची पाळी येईल. ह्मणून, असें करणें नीट नाहीं. आतां, परमेश्वरावर विश्वास ठेवून मी आपल्या मुलांमाणसांसह असाच येथें बसतों; मी आपल्या इतक्या लोकांचे जीव धोक्यांत घालीत नाहीं." परमेश्वर कृपेनें त्या सर्वांचा बचाव झाला.

रोम येथें आगस्टस ह्मणून एक बादशहा होऊन गेला. त्यास मारण्याचा एक कट झाला होता; त्यांत सिना ह्या नांवाचा एक मनुष्य मुख्य होता. तो कट फुटला आणि सिना ह्यास कैद केलें. नंतर त्यास काय शासन करावें, ह्याविषयीं बादशहास मोठा विचार पडला. कांकीं अशा अपराधांत सांपडलेल्या लोकांस त्यानें जिवें मारण्याचीं जीं शासनें पूर्वीं केलीं होतीं, त्यांचा कांहीं एक उपयोग झाला नव्हता. त्या विवंचनेंत तो स्तब्ध बसला असतां, त्याच्या चिंतेचें कारण तर्कून, त्याची राणी लिव्हिआ त्याच्या जवळ जाऊन नम्रपणानें ह्मणाली, "महाराज, एक विनंति आहे. ती कृपा करून ऐकावी. वैद्यांचा असा परिपाठ आहे कीं रोग्यास एक औषध लागू पडलें नाहीं तर पालटून दुसरें द्यावें; आणि तें दुसरें औषध, कधीं कधीं, पहिल्या औषधाच्या अगदीं उलट असावें. तसें आपण करून पहावें. आपण आजपर्यंत अशा अपराध्यांस

अतिशयित कडक शिक्षा करीत गेलां; त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. आतां, त्याच्या उलट, सिना ह्यास क्षमा करून, त्याजवर दया करून पहा बरें. त्याचें पाप बाहेर पडलें आहे. तो आतां आपल्यास इजा देणार नाहीं, हें खचीत; आणि आपण त्याला क्षमा करून जर त्याजवर दया केली, तर त्यापासून आपली हानि कांहीं एक न होतां उलटी कीर्ति वाढेल." हें बोलणें बादशहाच्या मनांत भरलें; आणि त्याप्रमाणें त्यानें सिना ह्यास त्याच्या अपराधांची क्षमा केली. तेव्हांपासून सिना हा त्याचा मित्र झाला.

इंग्लिश कविशिरोमणि शेक्स्पियर ह्यानें आपल्या काव्यांत एके जागीं असें ह्मटलें आहे कीं, "दया हें अमोलिक रत्न आकाशांतून पडलें आहे. तें ज्याच्या हातीं लागतें, तो धन्य होतो; आणि तो तें ज्याला देतो, तो सुखी होतो; ह्मणजे त्यापासून लाभ उभयपक्षीं होतो. .... जनास भयप्रद जो राजदंड, तो राजाच्या हातांत असतो; आणि अनाथांस किंवा दीनांस आधार अशी जी दया, ती त्याच्या अंतःकरणांत वास करिते." योग्यता अधिक कोणाची? हातांतल्या वस्तूची कीं अंतःकरणांतल्या वस्तूची? ज्यांचे ठायीं दया असते, ते धन्य होत.

---

## प्राण्यांच्या आंगावरची कातडी.

प्राण्यांची सर्वच शरीररचना विचार करण्यासारखी आहे. परंतु, तींत, सकृद्दर्शनीं, सगळ्या आंगावरचें अस्तरण ह्मणजे कातडी, ही प्रथम दृष्टीसमोर येते. ती

अहोरात्र आपल्या डोळ्यांपुढें असते. तरी, तिची रचना आपणांस ठाऊक नाहीं, हें ठीक नाहीं. ह्मणून तीसंबंधीं कांहीं कांहीं गोष्टी येथें सांगतों.

प्राण्याच्या अंगावर कातडी असते, ती, तीन थरांची बनलेली असते. अगदीं वरचा थर ह्मणजे वरचें आच्छादन होय. तें फार पातळ असतें; तें खालच्या दोन थरांच्या रक्षणाकरितां केलेलें असतें. त्याला स्पर्शज्ञान मुळींच नसतें; तरी, ज्या भागांच्या योगानें स्पर्शज्ञान होतें, त्या भागांच्या सांभाळास हें आच्छादन फार उपयोगीं पडतें. आंगावर फोड वगैरे झाला, ह्मणजे हें वरचें आच्छादन किंचित् उचलल्यासारखें आणि फाटल्यासारखें दिसतें, तें सर्वांच्या लक्षांत येण्यासारखें आहे. हें वरचें आच्छादन घर्षणानें जाड आणि बळकट होतें. त्यालाच घट्टे पडणें ह्मणतात. सुतार, लोहार, मजूर इत्यादिकांचे हात पहा; ह्मणजे हे घट्टे स्पष्ट दिसतील.

ह्या अगदीं वरच्या किंवा पहिल्या आच्छादनाला स्वतःचा रंग असा मुळींच नसतो. ह्मणजे एकाद्या सिद्दीच्या आंगावरचें हें आच्छादन आणि एकाद्या नाजूक गोऱ्या राजकन्येच्या आंगावरचें हें आच्छादन, ह्यांच्या रंगांत मुळींच फरक नसतो. तर, मनुष्यास गोरेपणा किंवा काळेपणा जो येतो, त्यास कारण वेगळाच एक फार मृदु पदार्थ असतो. तो, हें वरचें आच्छादन आणि ह्याच्या खालचें दुसरें आच्छादन, ह्यांच्या मध्यें, सारखा पातळ पसरलेला असतो. हा पदार्थ सिद्दीलोकांच्या कातडींत काळसर असतो, आणि

गोऱ्या किंवा युरोपियन माणसांच्या कातडींत पांढरा स्वच्छ असतो. हें दुसरें आच्छादन आणि त्याच्या खालचे भाग हीं गोऱ्या लोकांत आणि काळ्या लोकांत एकसारखीं असतात.

दुसरें आच्छादन ह्मटलें ह्मणजे, शिरांचें आणि ज्ञानतंतूंचें होय. हें सर्वांगभर पसरलेलें असतें. आणि ह्या ज्ञानतंतूंचा संबंध मगजाशीं असतो. हे ज्ञानतंतु आपल्या हाताच्या बोटांच्या शेवटांशीं फार सूक्ष्म आणि नाजूक असतात. त्यांचेठायीं स्पर्शज्ञानशक्ति विशेष असते; आणि त्यांचा संबंध प्रत्यक्ष मेंदूशीं असतो. तेणेंकरून कोणत्याही पदार्थाचें ज्ञान त्यांच्या योगानें लवकर आणि बरोबर होतें. ह्मणजे असें. अमुक एक पदार्थ अमक्या ठिकाणीं आहे, हें पायांसही कळेल; नाहींसें नाहीं. परंतु, त्याजविषयीं विशेष परिज्ञान करून घेण्यास त्याला हात लाविला पाहिजे. आणि ह्या जाळ्याच्या खालचें जें आच्छादन असतें तें तिसरें होय. त्यालाच खरी कातडी ह्मणतात. ह्या तीनही अच्छादनांचा जीव अगदीं एक झालेला असतो. तो इतका कीं, तीं तीन वेगळीं आहेत, असें कोणाला कळावयाचें सुद्धां नाहीं. तरी हीं तिन्हीं मिळून कातडी होते.

कितीएक प्राण्यांस अगदीं वरचें आच्छादन हें फारच जाड असतें. त्याचा मासला पाहायाचा असला तर हत्तीची कातडी पहावी. ह्याप्रमाणेंच हिपापोटेमस ह्मणून एक प्राणी आहे, त्याचेंही अगदीं वरचें आच्छादन असेंच जाड असतें. हिपापोटेमस हे प्राणी आफ्रिकेंत सांपडतात. हवेंत राहणाऱ्या प्राण्यांच्या वरचें हें

आच्छादन कोरडें आणि कांहींसें शिंगासारखें असतें; आणि पाण्यांत राहणाऱ्या प्राण्यांचें हें आच्छादन तेलकट असतें. तेणेंकरून आंतल्या नाजूक दोन आच्छादनांस पाण्यापासून इजा होत नाहीं. ही परमेश्वरी योजना लक्षांत ठेवण्यासारखी आहे.

आंगावरच्या कातडीच्या संबंधानें बेडकांविषयीं एक गोष्ट फार चमत्कारिक आहे. ह्मणजे, बाकीच्या प्राण्यांची कातडी त्यांच्या सर्व आंगास अगदीं चिकटलेली असते; आणि बेडकांची कातडी, त्यांच्या आंगास अगदीं थोड्या जागीं मात्र चिकटलेली असते. बाकी, ती त्यावर, पोकळ आंगरख्यासारखी घातलेली असते.

अगदीं वरच्या ह्या आच्छादनावर नेहमीं हवा खेळत असते; आणि हवेंत उष्णता असते; त्या उष्णतेच्या योगानें तें आच्छादन हाडासारखें अगदीं कठिण होऊन, निरुपयोगी व्हावयाचें; ह्मणजे, त्यांतून खालच्या ज्ञानतंतूंस कांहीं कळेनासें व्हावयाचें; तें न व्हावें ह्मणून विधात्यानें अशी योजना करून ठेविली आहे कीं, खालच्या खऱ्या ह्मणजे तिसऱ्या आच्छादनांत, ह्या वरच्यास लागून, अशा कांहीं गुठळ्या बसविल्या आहेत. त्या गुठळ्यांत तेलासारखा कांहीं पदार्थ उत्पन्न होतो. तो वरच्या आच्छादनास, बारीक बारीक नळ्यांतून येऊन मिळतो; आणि तेणेंकरून तें वरचें आच्छादन नरम आणि लवचीक असें निरंतर रहातें. ह्या नळ्यांचीं तोंडें जेथें त्या आच्छादनास मिळालेलीं असतात, तेथूनच बहुधा केश उगवतात.

ह्या अगदीं वरच्या आच्छादनाला घाम येण्याचीं

आणखी वेगळीं भोंकें असतात. त्या प्रत्येक भोंकाची नळी अगदीं खालच्या आच्छादनाखालीं जाऊन वेंटाळें होऊन बसलेली असते. घाम ह्मणजे, रक्तांतलें निरुपयोगी झालेलें पाणी, तें ह्या नळ्यांतून भोंकांवाटे शरीराबाहेर येतें. हीं घामाचीं छिद्रें मनुष्याच्या अंगावर इतकीं असतात कीं, त्याच्या अंगावर जर एक रुपया ठेविला, तर त्याच्याखालीं सुमारें दोन हजार छिद्रें झांकतील. कोणी शोधक पुरुषांनीं असा अदमास केला आहे कीं, सामान्य प्रतीच्या मनुष्याच्या आंगावर हीं घामाचीं रंध्रें सुमारें ७०,००,००० असावीं; आणि त्यांशीं ज्या नळ्यांचा संबंध जोडलेला असतो, त्यांची सर्वांची मिळून एकंदर लांबी २८ मैल असावी!

किती सुंदर आणि किती चमत्कारिक योजना ही! हिचा कर्ता ह्मणजे विधाता धन्य होय.

---

## सत्याच्या रक्षणार्थ जीभ कापून घेतली!

एकदा प्राचीनकालीं पिसिस्ट्र्याटिडनामक लोकांनीं अथेन्स येथील रयत लोकांवर पराकाष्ठेचा जुलूम चालविला. त्यापासून आपली सुटका कोणत्या युक्तीनें करून घ्यावी, ह्याचा विचार गुप्तपणें करण्याकरितां त्यांची पुढारी मंडळी एके रात्रीं लीना ह्या नांवाच्या एका गरीब कुलीन स्त्रीच्या घरीं जमली होती. तेथें पुष्कळ वाटाघाट झाली, परंतु, दुर्दैवेंकरून ती बातमी फुटली, आणि, तेथें काय काय बोलणें झालें हें काढून घेण्याकरितां पिसिस्ट्र्याटिड लोकांनीं लीनाबाईला धरून कैदेंत घातलें; आणि तिनें सगळी हकीकत बरोबर

रीतीनें सांगावी ह्मणून ते तिची विटंबना करूं लागले. तिचा तर निश्चय असा होता कीं, ती हकीकत सांगावयाची नाहीं, आणि असत्य भाषण तर करावयाचें नाहीं. आणखी तिच्या शरीराला क्लेश पराकाष्ठेचे होऊं लागले. तेव्हां तिला असें वाटलें कीं, त्या वेदनांच्या तळमळींत खरी हकीकत तोंडांतून निघून जाईल कीं काय कोण जाणे. तें न व्हावें, ह्मणून संधि साधून, तिनें मोठ्या धैर्यानें आपली जीभ चाकूनें समूळ कापून टाकिली! अथेन्सच्या लोकांनीं, तिच्या सन्मानार्थ तिचा पुतळा करून बसविला.

लीनाबाई मरून गेल्यास आज शेंकडों वर्षें झालीं; तरी, तिचें नांव इतिहासांत अजरामर झालें आहे. दुःख टाळण्याकरितां किंवा सुख संपादण्याकरितां जीं माणसें असत्य भाषण करितात, किंवा असत्याचरण करितात, त्यांनीं ह्या बाईची गोष्ट ऐकून मान खालीं घालावी.

---

## मागच्या अंकांतल्या प्रश्नाचें उत्तर.




कशी भिंत घालावी, ती रेघ काढून दाखविली आहे.

---

# बालबोध.



## महाराज आनंदराव पवार.

प्राचीन काळीं माळव्यामध्यें जे रजपुत स्थायिक झाले होते, त्यांचे वंशज पवार हे होत. ह्या पवारांपैकीं शिवाजी पवार हा प्रथम दक्षिणेंत येऊन, पुण्याच्या ईशान्येस बारा चौदा कोसांवर मळठण ह्मणून एक खेडें

आहे, तेथें जाऊन राहिला, आणि त्यानें तेथील पाटीलकी संपादिली. ह्या शिवाजीचा नातू बाबाजी ह्यास दोन मुलगे, संभाजी आणि काळोजी, हे थोरल्या शिवाजी महाराजांच्या लष्करामध्यें सरदार होते. ह्यांपैकीं संभाजीचे तिघे मुलगे उदाजी, आनंदराव, आणि जगदेव, ह्यांनीं शाहूमहाराजांच्या कारकीर्दींत पुष्कळ लढाया मारून कीर्ति संपादिली. उदाजीवर तर शाहू महाराज आणि त्यांचे मुख्य प्रधान बाजीराव पेशवे ह्यांची फार कृपा असे. पुढें आनंदराव वैभवास चढला; त्यास, इ० स० १७२४ ह्या वर्षीं, माळवा आणि गुजरात ह्या प्रांतांतला मराठ्याच्या हक्काचा पैसा वसूल करण्याचा अधिकार मिळाला. तेव्हां तो धार येथें राहिला. आणि त्यास कांहीं सरंजामही मिळाला. त्या वेळापासून धार हें शहर पवारांकडे आहे. हा आनंदराव इ०स०१७४९ त मरण पावला, आणि त्याचें काम त्याचा पुत्र यशवंतराव हा पाहूं लागला. हाही मोठा शूर होता. आणि "राजे" असें पद पवारांस जें मिळालें, तें प्रथम ह्यानेंच मिळविलें. हा, इ० स० १७६१ त, पाणिपत येथील महायुद्धामध्यें पतन पावला.

ह्यानंतर, एकामागूनएक असे अनेक राजे धारच्या गादीवर बसले, आणि शिंदेहोळकरांनीं त्यांस मनस्वी त्रास दिला. परंतु, पवार हे जातीचे मोठे शूर असल्यामुळें, आणि इ० स० १८२८ त त्यांचा आणि इंग्लिशसरकाराचा तह ठरल्यामुळें, पुढें त्यांस फारशी पीडा झाली नाहीं. यशवंतराव महाराज हे इ० स० १८३३ त गादीवर बसले, ते इ० स० १८५७ त मरण पावले. त्यांच्या पोटीं पुत्रसंतान नव्हतें, म्हणून, सध्याचे महाराज, आनंदराव

पवार ह्यांस दत्तक घेऊन गादीवर बसविलें. त्याच वर्षी शिपाई लोकांनीं बंड केलें; आणि त्यास धार संस्थानांतले कांहीं लोक अनुकूळ झाल्यासारखे दिसले. परंतु, हे महाराज वयानें अगदीं लहान होते, त्यामुळें त्यांचा संबंध त्या बंडाव्याकडे मुळींच नव्हता, हें उघड होतें. तरी इंग्लिशसरकारानें धारसंस्थान कांहीं वेळ जप्त करून ठेविलें होतें. परंतु, तें पुढें ह्या महाराजांस परत दिलें, आणि हे अल्पवयस्क होते, ह्मणून ह्यांच्या राज्याचा सगळा कारभार आपले हातीं ठेविला. पुढें हे महाराज वयांत आल्यावर आणि समजदार झाल्यावर, गव्हरनरजनरल सर जान लारेन्स ह्यांनीं, इ० स० १८६४ त, ह्यांस ह्यांच्या राज्याची पूर्ण मुखत्यारी दिली. तेव्हां आनंदराव महाराजांनीं ज्या अटी कबूल केल्या, त्यांमध्यें एक अट अशी आहे कीं, धारच्या दरबारांत जो प्रधान नेमावयाचा, तो आह्मी इंग्लिशसरकारच्या संमतानें नेमूं, आणि बहुतेक सगळी व्यवस्था पूर्वींप्रमाणें चालवूं. त्याप्रमाणें हें संस्थान यथास्थितपणें चाललें आहे. महाराज फार सुशील, मोठे धूर्त, आणि राज्यकारभारांत परमदक्ष आहेत. आपल्या प्रजेच्या सुखाच्या वृद्धीस ते निरंतर जपत असतात; तेणेंकरून त्यांची प्रजा त्यांजवर संतुष्ट असून सुखी आहे. ह्मणजे, राज्य चालविण्याचा जो मुख्य हेतु, तो ह्यांच्या राज्यांत उत्तम प्रकारें सिद्धीस जात आहे. हें संस्थान असेंच निरंतर आनंदांत राहो, असें आह्मी परमेश्वरापाशीं मागतों.

धार संस्थानाची राजधानी धार हें शहर आहे. येथील लोकसंख्या आठ नऊ हजार आहे. धार संस्थानचें क्षे-

त्रफळ २६९१ चौरसमैल आहे; लोकसंख्या १,२५,००० आहे; आणि उत्पन्न ४,३७,००० रुपये आहे.

## आंब्याचें झाड.

### श्लोक.

आम्रा तरू दिसति या शतशा वनांत
नाहीं तुझ्यासम दुजा गमतें मनांत
आहेत कीं गुण तुझे उपयुक्त मोठे
नाहीं तयांस तुलना भुवनांत कोठें. १.
आहेत पल्लव तुझे शुभकार्यचिन्हें
संतोषती जनमनें बघतां विखिन्नें
अन्यांत हा गुण पहा तिळमात्र नाहीं
वंदू नये मग तरो तुज कां जनांहीं. २.
उष्णीं दमोनि तवसन्निध ये प्रवासी
छाया तुझी प्रथम दे सुख बा तयासी
त्यानंतरें अमृततुल्य तुझ्या फलांहीं
होतें अमूप सुख कोण ह्मणेल नाहीं. ३.
सर्वां समानपण केवळ मूर्तिमंत
ठायीं तुझ्या वसतसे गुण हा पसंत
कीं कोकिळीं अधिक लोभ उणा न काकीं
वाखाणितात गुण हा सुर सर्व नाकीं. ४.
कोणाकडून उपकार कधीं न घेणें
जें देववेल सुख तें इतरांस देणें
या वर्तना बघुनि साधुहि लाजताती
कीं भक्ति ते करुनि मुक्तिस मागताती. ५.
ज्या ईश्वरें जनु दिलें तुज भूमिलोकीं
त्याची अशीच निरपेक्ष कृती विलोकीं
बापांतलें वळण पूर्ण मुलांत आलें
आश्चर्य तें तरुवरा वद काय झालें. ६.

## मन स्वाधीन ठेवणें हेंच मोठेपण.

खाण्याचे पदार्थ, वापरण्याच्या वस्तु, सौंदर्याचे पर्याय, इत्यादिकांविषयीं सर्वांची आवड एकसारखी नसते. एकाच घरामध्यें जी गोष्ट बापलेंकांस चांगली वाटते, ती सासवासुनांस पसंत पडत नाहीं. फार काय सांगावें, त्याविषयीं प्रत्यक्ष बापलेंकांच्या रुचींत अंतर पडतें. परंतु ह्या जगामध्यें एक गोष्ट इतकी उत्तम आहे कीं, तीविषयीं सर्वांची एकवाक्यता असते; एवढेंच केवळ नव्हे, तर, ती सर्वांस अगदीं एकसारखी प्रिय वाटते, आणि ती आपणांस प्राप्त व्हावी, अशी त्यांस वारंवार इच्छा होते. ती वस्तु बाजारांत विकत मिळत नाहीं; कीं दुसऱ्यापासून कोणत्याही प्रकारें घेतां येत नाहीं. ती ठेवायाला जागा लागत नाहीं; आणि ती कितीही लोकांनीं घेतली, तरी सरत नाहीं. आणखी, ती एकदा प्राप्त झाली ह्मणजे, ती त्या मनुष्याची, अशी, तो मरण पावल्यावरही युगांचीं युगें गाजत असते. इतर वस्तु कालेंकरून नाश पावतात; पण, ती वस्तु बहुधा चिरकाळ राहाते. आणखी, तिजमध्यें सर्वांत चमत्कारिक गुण हा आहे कीं, ती, प्रत्येक मनुष्यास बसल्याजागीं मिळण्यासारखी असते. किंबहुना ती त्याच्या अंतःकरणांत ठेवलेली असते; ती बाहेर काढणें, एवढेंच कायतें त्याचें काम असतें.

अशी वस्तु तरी कोणती ? ह्याचें उत्तर एवढेंच कीं, अशी वस्तु मनाचा मोठेपणा होय; ह्यालाच थोरपण ह्मणतात. खऱ्या थोरपणाची निंदा करणारा, असा मनुष्य जगांत आजपर्यंत झाला नाहीं, आणि पुढें व्हाव-

याचा नाहीं. जे कोणी पुरुष अत्यंत निंद्य व्यसनांत मग्न झालेले असतात, ते देखील, सरळपणानें बोलत असतात तेव्हां, थोरपणाची प्रशंसा करून, आपल्या कृतीस नांवें ठेवितात. चोर, दरोडेखोर असतात, ते देखील साधूंच्या पायां पडतात, असें वारंवार दृष्टीस पडतें.

हा थोरपणा जो अंतःकरणांत आहे, तो बाहेर काढण्यास, आणि त्यापासून स्वपरहित साधण्यास केवळ एकच मार्ग आहे. तो हा कीं, आपली मनोदेवता आपणांस जें वाईट ह्मणून सांगते, तें, आपली वासना एकीकडे ठेवून, न करणें, आणि जें चांगलें ह्मणून सांगते, तें, कोणाची पर्वा न करितां करणें. हें काम प्रथम फार कठिण दिसतें. परंतु, तें अभ्यासानें अगदीं सोपें होतें, असें मोठमोठे पुरुष सांगतात; त्यावर आपला विश्वास असावा. तोंडवळ्यावरून मनुष्याची पारख करणारा एक मनुष्य साक्रेटिसाकडे पाहून ह्मणाला, “ हा मनुष्य अत्यंत दुष्ट आणि दुराचारी आहे. ” तें ऐकून साक्रेटिसाची शिष्यमंडळी त्याची टर करूं लागली. त्यांस शांतपणानें तो महात्मा ह्मणाला, “ इतर माणसांच्या मनांप्रमाणेंच माझें मन पापी आहे. त्यांत वाईट विचार वारंवार येतात, त्यांची झांक माझ्या मुद्रेवर कदाचित् दिसली असेल, ह्मणून तो मनुष्य असें बोलला. त्या वाईट विचारांचा त्याग करून, मीं आपलें अंतःकरण सदाचरणाच्या मार्गास लाविलें आहे, आणि माझें आचरण हें त्याचें फल होय; आणि हें सर्व मला केवळ नित्याभ्यासानें साधलें आहे. ” ह्या बोलण्याचें तात्पर्य एवढेंच कीं, मनांत वाईट कल्पना उत्पन्न होण्याविषयीं, साधूंच्या स्थितींत आणि दुष्टांच्या स्थितींत फारसा फरक

नसतो. परंतु त्यांत भेद एवढाच कीं, साधु जे असतात, ते, त्या वाईट कल्पना आपल्या स्वाधीन ठेवून त्यांचा अंमल आपणांवर चालूं देत नसतात; आणि इतरजन, त्या कल्पनांच्या स्वाधीन होऊन, त्यांच्या अनुरोधानें वागतात. आजपर्यंत थोरपणाविषयीं ज्यांची कीर्ति गाजत आहे, त्यांनीं आपल्या वासना आपल्या स्वाधीन ठेविल्या होत्या. ह्यासच मनोजय ह्मणतात.

डायोजिनिस नांवाच्या तत्त्ववेत्त्याचा विलक्षण मनोजय पाहून शिकंदरबादशहा एकदा ह्मणाला, "मी जर शिकंदर नसतों, तर आज मोठ्या संतोषानें डायोजिनिस झालों असतों. पण काय करूं मी ह्यांत पडलों."

ह्यावरून मनोजयाची योग्यता मनांत आणावी. साधु हीं मनोजयाचीं मूर्तिमंत उदाहरणें होत. राजा थोर, आणि साधुही थोर; परंतु आपल्या ह्या राष्ट्रामध्यें तुकाराम महाराजांस देवाप्रमाणें भजणारे जितके लोक निघतील, त्यांच्या दहाव्या हिशानें तरी शिवाजी महाराजांस जाणणारे निघतील कीं नाहीं, ह्याचा संशय वाटतो.

---

## महाभारत.

सगळ्या पृथ्वीमध्यें जे फार मोठे ग्रंथ उपलब्ध आहेत, त्यांत महाभारताएवढा दुसरा एकही ग्रंथ नाहीं. हा ग्रंथ अनेक कथांचें भांडार आहे. ह्याचा कर्ता व्यास नांवाचा कोणी मोठा ऋषि होऊन गेला. त्यानें ह्या ग्रंथाची रचना इसवी सनाच्या पूर्वीच्या दुसऱ्या किंवा तिसऱ्या शतकांत केलेली असावी, असा शोध युरोपिनय पंडितांनीं लाविला आहे. ह्या ग्रंथाचे मुख्य भाग अठरा

केले आहेत. त्यांतल्या प्रत्येकास पर्व ह्मणतात. त्या पर्वांचीं नांवें आणि त्यांतलीं कथानकें येथें थोड्यांत सांगतों.

१. **आदिपर्व.**—ह्मणजे आरंभींचें पर्व. भीष्मानें धृतराष्ट्र आणि पंडु ह्यांचें पालनपोषण केलें; धृतराष्ट्रास गांधारीच्या पोटीं शंभर पुत्र—कौरव—झाले; आणि पंडूस कुंति आणि माद्रि ह्यांच्या पोटीं पांच पुत्र—पांडव—झाले; ह्याचें वर्णन ह्यांत केलें आहे.

२. **सभापर्व.**—पांडवांतला वडील भाऊ, धर्म हा, राजसभेमध्यें शकुनीमामाबरोबर द्यूत खेळायास प्रवृत्त झाला; आणि त्यांत, पण लावून, त्यानें आपलें सर्वस्व हारविल्यामुळें, त्याला, आपल्या चौघां भावांसहवर्तमान आणि पत्नी द्रौपदी हिजसहवर्तमान बारा वर्षें वनवासास जावें लागलें; त्याचें कथन ह्यांत आहे.

३. **वनपर्व.**—ह्यांत, काम्यकवनामध्यें पांडवांनीं वनवास कसा काढिला, ह्याचें वर्णन आहे. हें पर्व फार मोठें आहे. ह्यांतच नळराजा आणि किरातार्जुनीय ह्यांच्या कथा आहेत.

४. **विराटपर्व.**—वनवास संपल्यावर एक वर्षपर्यंत अज्ञातवास, विराटराजाच्या येथें पांडवांनीं कसा काढिला, ह्याचें वर्णन ह्यांत आहे.

५. **उद्योगपर्व.**—ह्यांत कौरवपांडवांकडची युद्धाची तयारी कशी झाली, तिचें कथन केलें आहे.

६. **भीष्मपर्व.**—कौरवपांडवांचें तुमुल युद्ध कुरुक्षेत्रीं, ह्मणजे दिल्लीच्या वायव्येस एक मोठें मैदान होतें तेथें झालें; त्यांत कौरवांकडे सेनापति भीष्म होता; त्यास अर्जुनानें स्वपराक्रमानें शरपंजरीं पाडिलें; त्याचें वर्णन ह्यांत आहे.

७. **द्रोणपर्व**.—ह्यांत, कौरवांचा सेनापति द्रोण झाल्यावर ज्या लढाया झाल्या, त्यांचें वर्णन आहे. त्यांत द्रोण आणि अभिमन्यु हे पतन पावले.

८. **कर्णपर्व**.—ह्यांत कौरवांचा सेनापति कर्ण झाल्यावर ज्या लढाया झाल्या, त्यांचें वर्णन आहे. ह्यांतच अर्जुनानें कर्णास ठार मारिलें.

९. **शल्यपर्व**.—ह्यांत, कौरवांच्या सैन्याचा सेनापति शल्य झाल्यावर ज्या लढाया झाल्या, त्यांचें वर्णन आहे. शेवटच्या लढायांनंतर दुर्योधन आणि दुसरे तिघे कौरवयोद्धे अवशिष्ट राहिले. पुढें भीम आणि दुर्योधन ह्यांचें गदायुद्ध झालें. त्यांत दुर्योधन पतन पावला.

१०. **सौप्तिकपर्व**.—राहिलेल्या तीन कौरवयोध्यांनीं रात्रीच्या वेळीं पांडवांच्या छावणीवर छापा घालून, पांडव खेरीजकरून बाकी सगळे वीर मारिले, त्याचें वर्णन ह्यांत आहे.

११. **स्त्रीपर्व**.—ह्यांत, गांधारीचा पुत्रशोक आणि इतर वीरपत्न्यांचा पतिमरणशोक ह्यांचें वर्णन आहे.

१२. **शांतिपर्व**.—हस्तिनापुरास धर्मराजास सिंहासन प्राप्त झालें; आणि नंतर, त्यास आप्तांच्या वधामुळें, पश्चात्ताप झाल्यावरून, त्यास भीष्मानें राजधर्म, आपद्धर्म, आणि मोक्षधर्म असे धर्म सांगितले, त्यांचें वर्णन ह्यांत आहे.

१३. **अनुशासनपर्व**.—ह्यांतही भीष्माचा बोधच पुढें चालला आहे. त्यांत नीति उत्तम प्रकारची सांगितली आहे, आणि पुष्कळ बोधपर गोष्टी सांगितल्या आहेत. शेवटीं, भीष्मानें देह ठेविला, त्याचें वर्णन आहे.

१४. **अश्वमेधपर्व**.—ह्यांत धर्मराजाच्या अश्वमेधाचें वर्णन आहे.

१५. **आश्रमवासीपर्व**.—ह्यांत धृतराष्ट्र, गांधारी, आणि कुंती हीं अरण्यांमध्यें मठांत जाऊन राहिलीं, आणि दोन वर्षांनंतर, तेथें अग्निकाष्ठें भक्षून त्यांनीं मोक्षसाधन केलें ह्याचें वर्णन आहे.

१६. **मौसलपर्व**.—ह्यांत कृष्ण आणि बळराम निजधामास गेले, द्वारका समुद्रांत बुडाली, आणि यादव गदायुद्धें करून देह ठेविते झाले, ह्याचें वर्णन आहे.

१७. **महाप्रस्थानिकपर्व**.—धर्मराज आणि त्याचे चार बंधु राज्यत्याग करून मेरुपर्वतावर इंद्रलोकीं गेले, त्याचें वर्णन ह्यांत आहे.

१८. **स्वर्गारोहणपर्व**.—ह्यांत, पांडव द्रौपदीसहवर्तमान आणि आपल्या आप्तांसहवर्तमान स्वर्गवासी झाले, ह्याचें वर्णन आहे.

ह्या सगळ्या पर्वांवर मोरोपंतांनीं मराठी आर्या केल्या आहेत. त्या फार सुंदर आहेत.

---

## मनुष्याच्या आंगांतलीं हाडें.

मनुष्याच्या शरीरांत पायांपासून डोक्यापर्यंत, हाडें पुष्कळ असतात. तीं जागोजाग सांधे आणि बंद ह्यांच्या योगानें अशा प्रकारें जोडलेलीं असतात कीं, तेणेंकरून त्यांस आपले व्यवहार चालविण्यास पाहिजे तसें चलनवलन करितां येतें. आणि हाडांच्या आश्रयानें शरीरास मजबुदी येते.

हाडांचा रंग पांढरा असतो. आणि तीं खनिज आणि प्राणिज ह्या दोन प्रकारच्या पदार्थांचीं बनलेलीं अस-

तात. खनिज ह्मणजे मातीसारखे पृथ्वींतले पदार्थ, आणि प्राणिज ह्मणजे प्राण्यांच्या आंगांमध्यें उत्पन्न झालेले पदार्थ होत. एखादें हाड बराच वेळ विस्तवांत ठेविलें ह्मणजे त्यांतला प्राणिज पदार्थ जळून नाहींसा होतो, आणि त्यामध्यें खनिज पदार्थ मात्र राहतो; आणि तें अतिशयित ठिसूळ होतें. हाडांस वाढण्यास जें द्रव्य पाहिजे असतें, तें, त्यांमध्यें, ज्या रक्तवाहक शिरा असतात, त्यांच्या योगानें त्यांस मिळतें; आणि त्यांतलें निरुपयोगी झालेलें द्रव्य त्यांतूनच बाहेर पडतें.

एकंदर सगळ्या शरीराचे मुख्य भाग ह्मटले ह्मणजे शिर, धड, हात आणि पाय, हे चार होत. ह्यांपैकीं शिरामध्यें हाडें ६२ असतात; धडामध्यें ५४ असतात; हातांमध्यें ६४ असतात, आणि पायांमध्यें ६० असतात; अशीं एकंदर, सगळीं मिळून २४० हाडें माणसाच्या शरीरामध्यें असतात. तरी, ह्या संख्येविषयीं बराच अनिश्चितपणा आहे. ह्याचें कारण असें कीं, वयपरत्वें माणसाच्या शरीरांतलीं हाडें कमी कमी होत जातात. पहा. बालपणामध्यें मनुष्याच्या उरांत आठ वेगळीं वेगळीं हाडें असतात; त्या आठांची जुळाजूळ होऊन तरुणपणीं त्यांचीं तीन होतात; आणि ह्मातारपणीं त्या तिहींचें हाड एक होतें.

शिरामध्यें मस्तकाचीं हाडें आठ असतात; त्यांच्यामध्यें जी पोकळी असते, तींत मेंदू असतो. हीं हाडें फार कठिण, चिवट, आणि त्यांच्या कडा नागमोडीसारख्या करून गच्च बसविलेलीं, अशीं असतात. कानांत आठ हाडें असतात; दांत ३२ असतात; आणि तोंडाचीं हाडें १४ असतात.

धडामध्यें, कण्याचे मणके २४, फांसळ्या २४, खा-

ळच्या पोटाचीं हाडें ४, उराचें हाड एक, आणि जिभेच्या बुडाजवळचें हाड एक; अशीं ६४ हाडें असतात.

मनुष्यें लहान असतात तेव्हां त्यांच्या हाडांत खनिज पदार्थ पुष्कळ नसतो, ह्मणून तीं बळकट नसतात. ह्मणून, अगदीं लहान मुलांस वारंवार उभें करून ठेवूं नये; कांकीं, त्याच्या योगानें त्यांचें पाय वांकडे होण्याचें भय आहे.

दांत एवढींच काय तीं हाडें आंगाबाहेर दिसतात. आणि आपला हात लागतो असा काय तो तेवढ्यानांच; ह्मणून ते स्वच्छ ठेवणें हें आपलें काम आहे. ते राखुंडी लावून धुवावे, आणि त्यांजवर जो पांढरा बुरा जमतो, तो काढून टाकावा. नाहींतर त्यांस घाण येते. तंबाखू खाल्यानें दांत बळकट होतात, असें जें ह्मणणें आहे, तें अगदीं खोटें आहे. तंबाखू खाऊं नये.

हाडांची रचना परमेश्वरानें अशी करून ठेविली आहे कीं, जर त्यांतलें एकादें मोडलें, तर, तें, जशाचें तसें नीट जुळून, तोंडें मिळवून गच्च बांधावें; आणि तें सरकूं नये ह्मणून त्याच्या वर खालीं बारीक फळ्यांचे तुकडे बांधावे; आणि तें तसेंच कांहीं आठवडेपर्यंत राहूं द्यावें; ह्मणजे तें आपोआप सांधतें. पण, तें काम कुशलतेनें केलें पाहिजे. नाहींतर, तें हाड जसें वांकडें बसेल, तसें सांधेल; आणि मग नीट व्हावयास फार त्रास पडेल.

---

## चतुरपुरुषलक्षण.

मुखीं सत्य अंगें विनीत, तेणें जिंकिलें जग समस्त;
इहीं सद्गुणीं आलंकृत, चतुरें झालें पाहिजे.

मुक्तेश्वर.

---

# बालबोध.



## सर चार्लस मेटकाफ.



स्वदेशाचें हित साधण्यास कायावाचामनें झटतात, ते तर धन्य खरेच; परंतु, परदेशाचें हित साधण्यास जे पुरुष तसेच परिश्रम करितात, त्यांस आह्मी विशेष धन्य ह्मणतों. कां कीं, त्यांच्या कृतीमध्यें चांगुलपण असून शिवाय परोपकार असतो. असे जे परदेशोपकारी पुरुष इंग्लंडांत होऊन गेले, त्यांत सर चार्लस मेटकाफ हा एक गृहस्थ होता. त्याचें चरित्र आह्मी येथें देतों.

चार्लस मेटकाफ हा इंग्लंडांत फर्नहिल येथें इ० स० १७८५ त जन्मला. तो पंधरा वर्षांचा असतां, ईस्ट इंडिया कंपनीची चाकरी पतकरून हिंदुस्थानांत

आला. तो जात्या मोठा चपळ, उद्योगी, आणि धूर्त होता. त्याच्या कामकाजावरून त्याच्या योग्यतेविषयीं चांगली प्रसिद्धि झाल्यावरून त्याला, तेव्हांचा गव्हरनर जनरल लार्ड मिंटो ह्यानें, इ० स० १८०८ ह्या वर्षी, लाहोरास महाराज रणजितसिंग ह्याशीं तह करण्याच्या कामावर वकील नेमून पाठविलें. तें काम फार नाजूक आणि अवघड होतें. तरी तें त्यानें मोठ्या युक्तीनें सिद्धीस नेलें. तेणेंकरून त्याची फार वाहवा झाली. नंतर तशींच मोठमोठीं कामें त्याला मिळत जाऊन, शेवटीं इ० स० १८३५ च्या मे महिन्यांत तो गव्हरनर जनरल झाला; तें काम त्यानें इ० स० १८३६ च्या मार्च महिन्यापर्यंत चालविलें. त्या मुदतींत त्यानें हिंदुस्थानच्या कल्याणाचीं अनेक कामें केलीं; त्यांत एक असें केलें कीं, त्याची बरोबरी दुसऱ्या कोणत्याही कामाच्यानें करवणार नाहीं. तें काम ह्मटलें ह्मणजे हें कीं, छापखान्यावर आणि वर्तमानपत्रांवर जे जुलुमाचे अनेक प्रतिबंध होते, ते सगळे त्यानें एकदम काढून टाकिले; किंबहुना त्यानें हिंदुस्थानांतल्या छापखान्यास वाचा दिली, असें ह्मटलें तरी शोभेल. ह्या त्याच्या देणगीचा उपयोग फार झाला आहे; आणि हिंदुस्थानांत सांप्रत काळीं ज्ञानाचा प्रसार पुष्कळ होऊन, लोकांस युक्तायुक्त कळण्याचें आणि बोलण्याचें जें सामर्थ्य प्राप्त झालें आहे, तें ह्या देणगीचें फळ होय. ह्याबद्दल आह्मीं हिंदुस्थानवासी जनांनीं त्याचे उपकार निरंतर स्मरावे.

हिंदुस्थानांतल्या लोकांविषयीं सर चार्लस मेटकाफ ह्याचा अभिप्राय चांगला होता. त्याविषयीं त्यानें एके

ठिकाणीं असें लिहिलें आहे कीं, "हिंदुस्थानांतील आमच्या राज्याचा शेवट परमेश्वराच्या इच्छेनुरूप जो व्हावयाचा असेल तो होवो. परंतु, जावत्कालपावेतों ह्या देशाचें स्वामित्व जगदीश्वरानें आमच्या हातीं दिलें आहे, तावत्कालपावेतों होईल तितकें करून येथील लोकांच्या कल्याणाकरितां झटणें, हें आमचें मुख्य कर्तव्यकर्म आहे." हा विचार किती उत्तम आहे पहा! जे इंग्लिश लोक ह्या देशामध्यें मोठमोठ्या कामांवर येतात, त्यांच्या मनांत जर असे विचार निरंतर जागृत राहतील, तर आमच्या ह्या राष्ट्रास किती लाभ होतील बरें!

सर चार्लस मेटकाफ हा धार्मिकही तसाच होता. मरण येण्याच्या आधीं त्याला मोठें दुखणें येऊन पुष्कळ क्लेश भोगावे लागले. तरी, त्याच्या मनाची शांति ढळली नाहीं. त्या दुःखप्रद स्थितींत असतां त्यानें आपल्या एका मित्रास लिहिलें कीं, "परमेश्वरानें मजवर जे उपकार केले आहेत, त्यांची आठवण होऊन, माझें अंतःकरण वारंवार सद्गदित होतें, आणि माझ्या नेत्रांतून अश्रुधारा वाहूं लागतात." खऱ्या धार्मिकांचें हें लक्षण होय.

हा पुरुष इ० स० १८४६ त मरण पावला. तेव्हां ह्याचें वय ६१ वर्षांचें होतें.

---

## सुख आणि परपीडा.

### आर्या.

सर्व व्यवसायांचा हेतु असे एक मुख्य संसार
तो चालवावयाला पडताती श्रम जनांस अनिवार १.
धीवर मासे धरितो नृप घेतो राज्यभार निजमाथां
त्यांमध्यें अंतर बहु परि दिसतो हेतु एक पाहातां. २.

७१८९५

त्यांत चमत्कार पहा परपीडेवीण एकही नाहीं.
करितां येत कुणाला व्यवसाय श्रेष्ठ वा कम गुणांहीं. ३.
धीवर हरितो मत्स्यप्राणांतें तो तसाच शेतकरी
पशु कष्टवूनि निजहित साधायाचा सदैव यत्न करी, ४.
वैश्य व्यवहारीं बहु असत्य बोलुनि जनांस नागविती
त्यावांचूनि तयांचें नाहीं निभणार साफ ते म्हणती. ५.
मोठ्या पराक्रमानें जिंकी परदेश भूपती जेव्हां.
लक्षावधि जीवांचा समरीं संहार होय कीं तेव्हां. ६.
वित्त प्रजा मिळविते श्रमेंकरुनि भूप त्यांतलें घेतो
तेव्हांच तया घेतां सुखोपभोग स्वयें पहा येतो. ७.
मनुजाचिया श्रमांचा खाते चोरोनि शर्कराखंड
मुंगी तेव्हांच तिला सुख होतें या धरेवर उदंड. ८.
यावरुनि असें गमतें कीं परपीडेशिवाय कोणाला
होऊं नये सुख कधीं सहसा हा नियम काय हो झाला. ९.
ज्यामध्यें अघ नाहीं नाहीं परहानि लवहि तें काम
संपादोनि करावें कायावाचामनें सुखी धाम. १०.

---

## दुर्व्यसन.

पटकी, देवी, ताप इत्यादि रोगांची सात येते; ह्मणजे, ते रोग एका माणसाचे दुसऱ्या माणसास लागून, ते इतके फैलावतात कीं, कधीं कधीं त्यांच्या पायीं गांवांचे गांव ओस पडतात. तसें, आरोग्याचें ह्मणजे प्रकृतीच्या सुदृढपणाचें होत नाहीं. ह्मणजे, एकाद्या गांवांत प्रथम पांच चार मनुष्यें चांगलीं निरोगी झाल्यावरून, त्यांच्या संयोगानें त्यांच्या जवळचीं शें दोनशें माणसें तशीं सुदृढ झालीं आहेत, असें कधीं घडत नाहीं. ह्याचें तात्पर्य एवढेंच आहे कीं, दुःखदायक गोष्टींचा प्रसार माणसांमध्यें जसा लवकर आणि सहज होतो, तसा सुखदायक गोष्टींचा होत नाहीं.

हाच नियम दुर्व्यसनें आणि चांगल्या संवई ह्मांस लागू आहे. दुनियेमध्यें कोणी कधीं दुर्व्यसनांच्या शाळा घातल्या नाहींत; तरी, तीं वाढत चाललीं आहेत, आणि, चांगल्या संवई मुलांस लावण्याविषयीं शाळांतून आणि घरीं, शिक्षक आणि आईबापें इतके श्रम अहोरात्र करीत असतात, तरीं, त्यांचें फल, व्हावें, त्याच्या दहाव्या हिशाइतकें देखील होत नाहीं. हें अत्यंत अनिष्ट आहे. दुर्व्यसनें कोणतीं, हीं आतां सर्वांस ठाऊक झालीं आहेत; आणि त्यांचे परिणाम किती वाईट होतात, ते समजले आहेत; ह्मास्तव तीं टाळण्याचा प्रयत्न करणें हें आपलें अवश्य कर्तव्य आहे, असें प्रत्येक माणसानें मनांत धरिलें पाहिजे. आणि त्याप्रमाणें वागलें पाहिजे.

त्याप्रमाणें चांगल्या संवईंविषयींही माहिती झालेली आहे. ह्मणजे चांगल्या संवई कोणत्या, व त्यांचीं फळें कशीं प्राप्त होतात, हें समजलें आहे. तें लक्षांत ठेवून, त्या चांगल्या संवई धरण्याविषयीं प्रयत्न करावा. ह्मणजे त्यांपासून सुख होईल.

सध्याच्या काळचीं साधारण दुर्व्यसनें ह्मटलीं ह्मणजे, असत्य भाषण करणें, बीभत्स बोलणें, तंबाखू खाणें किंवा ओढणें, गांजा ओढणें, दारू पिणें, जुगार खेळणें, श्रेष्ठाचा अपमान करणें, वाईट लोकांच्या संगतीस लागणें, आणि ज्यापासून कांहींएक हित होत नाहीं, केवळ नाश होतो, असें करणें, हीं होत. हीं सर्वथैव वर्जावीं.

तसेंच खरें बोलणें, चौघांत पटेल असें भाषण करणें, ज्ञानसंपादनाचा हव्यास धरणें, श्रेष्ठांस मान देणें, जें वंद्य आहे तें मात्र निरंतर करणें, आणि परमेश्वरास

भिणें ह्या चांगल्या संवई होत. ह्यांपासून निरंतर हितच व्हावयाचें; अहित कधीं व्हावयाचें नाहीं; त्या धराव्या.

मित्रांनो, तुमचीं अंतःकरणें हीं फार चांगलीं निर्मळ पात्रें परमेश्वरानें तुमच्या स्वाधीन केलीं आहेत; आणि, जगामध्यें, दुर्व्यसनें व चांगल्या संवई, ह्यांच्या जणु काय, दोन वेगळ्या वेगळ्या राशी घालून ठेविल्या आहेत. दुर्व्यसनांची रास, ती घाणीची आहे, आणि चांगल्या संवईची, ती कस्तूरीची आहे. तुह्मी आपल्या जवळच्या भांड्यांत ह्यांतलें जें कांहीं भराल, त्याच्या योग्यतेप्रमाणें तुह्मांस ह्या जगामध्यें दुःख किंवा सुख प्राप्त होईल. पहा, सगळें तुमच्या हातीं आहे. कबीरानें ह्मटलें आहे.—

"जब नर करणी करे सो नरका नारायण होय."

हें जर आपल्या हातचें आहे, तर आपण नारायण होण्याचा प्रयत्न कां न करावा? दुर्व्यसनांच्या नादास लागून पशु कां व्हावें? आणि आपली हानि कां करून घ्यावी?

एका संस्कृत कवीनें ह्मटलें आहे कीं:—

"विद्याव्यसनं व्यसनं ह्यथवा हरिपादसेवनं व्यसनम्."

ह्यांतलें कोणतेंही एक व्यसन ज्या मनुष्यास असतें, तो भाग्यवान होय. आणि हीं दोन्ही व्यसनें ज्यास लागतात, त्याच्या भाग्याचें वर्णन बृहस्पतीसही करितां यावयाचें नाहीं.

## माणसांचें खाणें.

प्राणी ह्मटला कीं त्याला खावयास पाहिजे. खाण्यांत तीन प्रकारचे पदार्थ असतात:—प्राण्यांपासून उत्पन्न झालेले, वनस्पतींपासून उत्पन्न झालेले, आणि ख-

निज, ह्मणजे पृथ्वीच्या पोटांत उत्पन्न झालेले. मासे आणि मांस हे प्राण्यांपासून झालेले होत; धान्य, फळफळावळ, गवत, आणि झाडपाला हे वनस्पतींपासून उत्पन्न झालेले होत; आणि मीठ, पाणी वगैरे पदार्थ खनिज होत. हे पदार्थ मनुष्यें शिजवून किंवा कमजास्त प्रमाणानें एकमेकांत मिसळून, आपल्या अभिरुचीप्रमाणें बनवून खातात. परंतु इतर प्राणी जे आहेत, ते, हे पदार्थ, जशाचे तसे, वेगळे वेगळे खातात.

सर्व माणसांचा आहार सारखा नसतो. लहानांस अन्न थोडें लागतें, मोठ्यांस पुष्कळ लागतें. बायकांस थोडें पुरतें, पुरुषांस अधिक लागतें. उष्ण देशांतल्या माणसांच्या आहारापेक्षां थंड देशांतल्या माणसांचा आहार मोठा असतो. साधारणपणें थंडीच्या दिवसांत, उन्हाळ्यापेक्षां मनुष्यास थोडेंसें अन्न अधिक जातें. शारीर श्रम करणाऱ्या लोकांस, मानसिक श्रम करणाऱ्या लोकांपेक्षां अन्न अधिक लागतें. लोहाराचा आहार, बहुधा, न्यायाधीशाच्या आहारापेक्षां मोठा असतो. शारीर श्रम करणाऱ्या माणसांच्या आहाराचा विचार करून, कमी न पडे आणि अधिक न होई, असें त्याचें प्रमाण बसवून, इंग्लिश सरकार, आपल्या पलटणींतल्या शिपायांस, प्रत्येकीं, दररोज, पक्का एक शेर अदपाव अन्न देतें.

अन्नाचें पचन झाल्यावांचून तें मनुष्याच्या उपयोगीं पडत नाहीं. खाण्यांतले कितीएक पदार्थ लवकर पचतात, आणि कितीएकांस फार वेळ लागतो. ह्याविषयींचे प्रयोग करून पाहून विद्वान् पुरुषांनीं त्यांचें कांहीं मान बसाविलें आहे. तें असें:—

| पदार्थाचें नांव | पचायास तास. |
|---|---|
| भात.... .... .... .... .... | १ |
| निरसें दूध.... .... .... .... | २ १/४ |
| तापवलेलें दूध. .... .... .... | २ |
| भाजलेले बटाटे. .... .... .... | २ १/३ |
| शिजवलेले बटाटे.... ... .... | ३ १/२ |
| गाजरांची भाजी .... .... .... | ३ १/४ |
| गव्हांची पोळी. .... .... .... | ३ १/२ |
| तूप. ... .... .... .... .... | ३ १/२ |
| ज्वारीची भाकर.... .... .... | ३ १/२ |
| कोबीची भाजी. .... .... .... | ४ १/२ |

आणखी असें आहे कीं, भातासारखे जे पदार्थ पचायास हलके असतात, त्यांत पौष्टिक अंश अगदीं कमी असतो. सगळ्या पदार्थांमध्यें मांसांत पौष्टिक अंश फार असतो. ह्मणजे भातांतला पौष्टिक अंश जर ८१ धरिला, तर त्या मानानें, मांसांतला पौष्टिक अंश ९११ धरावा लागतो. एवढें अंतर आहे; ह्मणूनच, मांस खाणारे लोक केवळ धान्य खाणाऱ्या लोकांपेक्षां, बहुधा सुदृढ आणि बळकट असतात.

अमुक प्राणी अमुक पदार्थ खातो किंवा खात नाहीं, ह्याविषयीं कांहीं नियम सांगतां यावयाचा नाहीं. परंतु, एवढें खचीत आहे कीं, जितक्या प्रकारचे पदार्थ मनुष्यें खातात, तितक्या प्रकारचे पदार्थ खाणारा असा दुसरा कोणीही प्राणी नाहीं. मनुष्य खात नाहीं, असा एकही प्राणी नाहीं. कोंबडीं, मेंढरें, बकरीं ह्यांखेरीज आणखी घोडीं, गाढवें, डुकरें, मांजरें, कुत्रीं, उंदीर,

बेडूक, गोगलगाई, नाकतोडे, मुंग्या, किडे, हीं सर्व त्याच्या भक्ष्यस्थानीं पडतात! बरें, इतकें करूनही आपणास भूतदयाशील, निरुपद्रवी आणि निर्मल ह्मणवून घेण्यास त्यास कांहींएक शंका वाटत नाहीं! असो.

आपलें खाणें चांगलें शिजवून, बारीक चावून सावकाश खावें. पोटभर जेवल्यावर लागलेंच नेटाच्या कामास लागूं नये. कांकीं तेणेंकरून पचनव्यापारास व्यत्यय येतो. खाणें, थोडी भूक ठेवून खावें, फार खाल्यानें रोग झाल्याचीं उदाहरणें पावलोपावलीं अढळतात; परंतु, खाणें कमी खाल्यानें रोग झाल्याचें उदाहरण सहसा कधीं दृष्टीस पडत नाहीं. "रुचेल तें बोलावें आणि पचेल तें खावें." त्याप्रमाणेंच, खाण्यासाठीं जगायाचें नाहीं, तर जगण्यासाठीं खायाचें आहे, हें निरंतर लक्षांत ठेवावें

---

## बादशहाला बोलण्यांत पकडलें!

कोणे एके वेळीं नेपोलियन बोनापार्ट हा बादशहा, आपल्या घोड्यावरून खालीं उतरून, आणि लगाम एका हातांत धरून, आपल्या सैन्याची कवाईत पहात होता. इतक्यांत त्याच्या हातांतून तो लगाम खालीं पडला, आणि त्यासरसा तो घोडा बुजून एकदम भरधांव निघाला. तें पाहून, पलटणींतल्या एका साधारण शिपायानें आपल्या रांगेंतून चटकर बाहेर पडून, बंदूक खालीं ठेवून, हळूच युक्तीनें जाऊन, तो घोडा धरिला, आणि परत बादशहाकडे आणिला. तेव्हां त्या बादशहास आनंद झाला, आणि तो त्या शिपायाकडे व-

कून, सलाम घेतल्यासारखी मान हालवून, किंचित् हं-सून ह्मणाला, "ठीक ठीक, सुभेदार, ठीक; तुह्मी फार चांगलें काम केलें." तें ऐकून, शिपायानें हात जोडून, त्यास विचारिलें, "महाराज, कोणत्या पलटणीचा सुभेदार मी?" त्यावर नेपोलियनानें उत्तर दिलें, "अरे, जा, तूं गाडर्डीच्या पलटणीचा सुभेदार बरें." हें कानीं पडतांच तो शिपाई, सुभेदारीचे कपडे वगैरे त्याजवळ नव्हते तरी, तसाच जाऊन, त्या पलटणीच्या अमलदारांत जाऊन बसला. त्यास पाहून त्या अमलदारांस नवल वाटलें, आणि त्यांनीं त्यास ह्मटलें, "अहो, तुह्मी येथें कोणीकडे हो?" त्यावर त्यानें त्यांस उत्तर दिलें, "कोणीकडे ह्मणून काय विचारितां? महाराजांनीं मला आतां इतक्यांत सुभेदार केलें, आणि मी सुभेदार झालों. ह्यांत नवल तें काय?" झालें. बादशहा सहज बोलून चुकला, तें त्याला परत घेतां येईना. तेव्हांपासून बादशहानें त्याला खरोखरच सुभेदार केलें. आणि त्यानें पुढें सरकारचीं मोठमोठीं कामें बजावून मोठा लौकिक मिळविला!

---

## चौपट कशी करावी?

डेन्मार्क देशामध्यें पूर्वीं केन्यूट ह्मणून एक राजा होऊन गेला. तो कांहींसा व्यसनी होता, तरी सर्व व्यवहारांत न्याय व्हावा, अशी त्याची फार इच्छा असे. कोणे एके वेळीं तो मद्यप्राशनानें धुंद होऊन, त्यानें आपल्या एका हुजऱ्याला ठार मारिलें. पुढें शुद्धीवर आल्यावर त्याला त्या कर्माचा अतिशयित पश्चात्ताप झाला; आणि तो आपण होऊन न्यायाधीशापुढें जाऊन

उभा राहून त्यास ह्मणाला कीं "माझ्या अपराधाची चौकशी करून मला योग्य शिक्षा करा." तेव्हां तो न्यायाधीश आपले ठिकाणीं फार शंकित झाला, आणि त्याच्यानें राजाच्या अपराधाची चौकशी करवेना. हें पाहून राजानें आपला न्याय आपणच करून असें ठरविलें कीं, "झालेल्या अपराधाबद्दल, केन्यूट हा राजा आहे ह्मणून त्यानें, साधारण लोकांच्या चौपट दंड सरकारांत दिला पाहिजे." आणि त्याप्रमाणें त्यानें लागलीच तितकी रकम आपल्या खासगींतली काढून सरकारी खजीन्यांत जमा केली. त्या वेळीं, खुनास शिक्षा दंडाची असे, ह्मणून हें चौपट शिक्षेचें साधलें. हीच जर मृत्यूची शिक्षा त्यास असती, तर तिची चौपट कशी करतां आली असती?

---

## अफगाणलोकांच्या विलक्षण समजुती.

मनुष्य उंच असून त्याला लांब दाढी असली, तर तो मूर्ख. कपाळ मोठें आणि वरच असणें, हें भाग्यलक्षण आहे. लाल डोळ्यांचा मनुष्य चिडखोर आणि भांडखोर असतो. ज्याचे ओंठ जाड असतात, तो योद्धा असतो. ज्याचे हात लांब असतात, तो उदार असतो. ज्याची कंबर मोठी असते, त्याच्या धैर्यांत कांहीं अर्थ नसतो. ठेंगणीं माणसें दगलबाज असतात; त्याप्रमाणेंच खोल डोळ्यांचीं आणि उंच नाकाचीं माणसेंही दगलबाज असतात. ज्यांचे केस मऊ असतात, त्यांचा स्वभाव चांगला असतो. नाकपुड्या फेंदरलेल्या असतात; तीं माणसें मोठीं कज्जाग असतात. दांत मोठे असतात त्यांस शहा-

णपण फार थोडें असतें. कान लांब असतात तीं माणसें दीर्घायुषी असतात.

ह्या समजुती त्यांच्या मनांत कशावरून भरल्या असाव्या, हें कोणी सांगावें? अशा सर्व प्रकारच्या लोकांतल्या समजुती जर एकत्र केल्या, तर, त्यांवरून कांहींतरी चांगलें अनुमान काढतां येईल असें वाटतें.

---

## न्याय कीं सोय?

इराणचा प्रख्यात राजा सायरस हा दहा बारा वर्षांचा असतां, त्यानें रस्त्यांत दोन मुलगे एकमेकांशीं भांडतांना पाहिले. त्याचें कारण त्याला असें कळलें कीं, त्यांतल्या मोठ्या मुलाच्या आंगांतला आंगरखा अंमळ लहान असल्यामुळें तो त्याला अडस होत होता; आणि धाकट्या मुलाच्या आंगांतला आंगरखा बराच मोठा असल्यामुळें तो त्याला गोंधळ्यासारखा ढिला होत होता; ह्मणून, आंगरख्यांची अदलाबदल करून उभयतांची सोय करण्याविषयीं थोरला मुलगा धाकट्यास आग्रह करीत होता; तो त्याचें ऐकेना. तेव्हां सायरसानें आपण होऊन त्यांत पडून, थोरल्या मुलाच्या ह्मणण्याप्रमाणें ती आंगरख्यांचीं अदलाबदल त्यांजकडून करविली; कां कीं त्यांत त्याला सोय विशेष दिसली. हें वर्तमान त्याच्या गुरूस कळलें तेव्हां तो त्या राजपुत्रास ह्मणाला, "न्याय करणें हें राजाचें काम; त्यानें सोईकडे पाहूं नये. श्रीमंत गृहस्थास त्याच्या गाडींतून ओढून काढून, तेथें एखाद्या दरिद्री पांगळ्यास बसविणें हें योग्य होईल काय?" हें ऐकून राजपुत्राचे डोळे उघडले.

---

# बालबोध.



## डाक्टर अनंत चंद्रोबा.



सुखाची वृद्धि करणें किंवा दुःखाचें निवारण करणें हा सर्व विद्यांचा खरा उपयोग आहे, असें मनांत आणून विचार केला ह्मणजे असें वाटतें कीं, वैद्यविद्येची बरोबरी करणारी दुसरी विद्या ह्या पृथ्वीवर नाहीं. इतर सर्व विद्या मनुष्यांस पुष्कळ प्राप्त झाल्या, आणि ही वैद्यविद्या जर त्यांच्या हातची अगदीं गेली, तर, त्या इतर विद्यांपासून त्यांला तिळमात्रही सुख होणार नाहीं. अशी जी वैद्यविद्या, तिजमध्यें, परिश्रम करून जे कोणी प्रवीण होतात, आणि लोकांच्या उपयोगीं पडतात, ते खरोखर थोर होत. डाक्टर अनंत चंद्रोबा हे त्यांपैकीं एक होते. त्यांचें चरित्र आह्मी येथें लिहितों.

गोमांतक प्रांतामध्यें कळगुटी ह्मणून एक गांव आहे. तेथें इ० स० १८२९ च्या सप्तंबर महिन्याच्या १०व्या तारखेस अनंत चंद्रोबा हे जन्मले. तेंव्हां त्यांच्या आई-बापांची फार गरीबी होती. अनंत चंद्रोबा हे तीन चार वर्षांचे असतां त्यांचे वडील, आपल्या मुलांमाणसांसह-वर्तमान मुंबईस आले; आणि पुढें सुमारें चार वर्षांनीं मरण पावले. अनंत चंद्रोबांनीं प्रथम एक वर्ष गुजराथी शाळेंत अभ्यास केला. आणि मग दोन वर्षें मराठी शाळेंत अभ्यास केला. त्यांत त्यांची बरीच गति झाली. परंतु, घरच्या गरीबीमुळें त्यांस दरमहा तीन रुपयांवर येथील टांकशाळेंत चाकरी पतकरावी लागली. तरी, पुनः थोडी सवड करून, चाकरी सोडून, विख्यात बाळ-गंगाधर शास्त्री जांभेकर ह्यांच्या आश्रयानें, ते एल्फि-न्स्टन् स्कुलांत इंग्रजी शिकण्यास, इ० स० १८४४ ह्या वर्षीं गेले. तेथें सुमारें दीड वर्षपर्यंत अभ्यास केल्यावर, इ० स० १८४५ ह्या वर्षीं, ग्रांटमेडिकल कालेज स्थापित होऊन, जे अगदीं प्रथम ४० विद्यार्थी परीक्षा घेऊन, निवडून त्यांत घेतले, त्यांत अनंत चंद्रोबा हे होते. तेथें त्यांनीं अभ्यास फार चांगल्या रीतीनें करून, तत्संबंधाचीं सगळीं बक्षिसें मिळविलीं; आणि इ० स० १८५१ ह्या वर्षीं त्यांची वैद्यविद्येची जी शेवटची परीक्षा झाली, तींत हे उत्तम ठरले. नंतर त्यांस दरमहा १०० रुपये पगार करून, सरकारानें, एका पलटणींत सब आसि-स्टंट सर्जन नेमून, इंदुरास पाठविलें. नंतर दीड वर्षानें त्यांची बदली भोपाळास झाली. तेथें त्यांस हवा मानेना, ह्मणून ते परत मुंबईस आले, आणि इ० स० १८५४ त कराचीस गेले. तेथें त्यांनीं सिंधी आणि फारशी ह्या

भाषांचा अभ्यास केला. तेथें त्यांच्या कामावरून त्यांची चांगली वाहवा झाली. सर बार्टर फ्रियर हे तेव्हां तेथें कमिशनर होते. यांनीं त्यांची सरकारांत मोठी शिफारस करून पगारही जास्त करविला. परंतु तेथें त्यांची मातुश्री निवर्तली, त्याच्या योगानें त्यांस फार दुःख झालें; आणि त्यांच्या प्रकृतीसही बरें वाटेना. ह्मणून, ते जे इ० स० १८५७त परत मुंबईस आले, ते येथें अखेरपर्यंत देवीखात्याच्या सुपरिंटेंडेंटच्या कामावर होते. हे गृहस्थ गेल्या महिन्याच्या १९ व्या तारखेस परलोकवासी झाले.

हे मोठे बुद्धिवान् होते. त्यांची स्मरणशक्ति जबरदस्त होती. गोष्ट किती ही दिवसांमागें झालेली असो; ती त्यांस पाहिजे तेव्हां अगदीं बरोबर आठवत असे. ते आपलें काम मोठ्या आस्थेनें करीत; आणि त्यांचें लक्ष गरीबाकडे विशेष असे; तेणेंकरून हे फार लोकप्रिय असत. मुंबईंत सक्तीनें देवी काढण्याचा कायदा चालू झाला, तेव्हां लोकांत कांहीं गडबड झाली नाहीं, ह्याचें सगळें यश डाक्टर अनंत चंद्रोबा ह्यांस आहे. हे मोठे रसिक होते. ह्यांस वामनी श्लोक आणि मोरोपंती आर्या हीं लावण्याचा नाद फार असे. ह्यांचे बंधु रा. रा. माधव चंद्रोबा हे "सर्वसंग्रह" नामक मासिक पुस्तक काढीत असत, त्यांत डाक्टर अनंत ह्यांचें पुष्कळ साह्य असे. जस्टिस आफ धी पीस, मुंबईच्या युनिव्हर्सिटीचे फेलो, आणि नामदार व्हाइसराय साहेबांचे आनररी असिस्टंट सर्जन, ह्या बहुमानप्रद पदव्या त्यांस सरकांतून मिळाल्या होत्या. हे गृहस्थ इतके विद्वान् असून त्यांचे ठायीं गर्व मुळींच नव्हता. आणि ते नेहमीं असें ह्मणत कीं, " जगांतल्या ज्ञानाचा

जो अंश आपणां माणसांस प्राप्त झाला आहे, तो अत्यंत अल्प आहे." ह्या गृहस्थांच्या मृत्यूनें पुष्कळ लोकांस दुःख झालें आहे. परंतु, परमेश्वरसत्तेपुढें उपाय नाहीं. डाक्टर अनंत चंद्रोबा ह्यांच्या अंतरात्म्यास परमेश्वर निरंतर शांति देवो.

---

## लेखणीचा महिमा.

### श्लोक.

हे लेखणी तव चरित्र विचित्र आहे
गातां बृहस्पतिहि होउनि थक्क राहे
तत्रापि अल्प कवि अल्पचि वर्णिताती
कीं त्यांत अल्प तरि ते सुख पावताती. १.
नाहीं तुझ्या सम कुणा समदृष्टि मोठी
पंक्तिप्रपंच न वसे तिळमात्र पोटीं
चांडाळ साधु अपवित्र पवित्र यांतें
तूं सारखी विवश कार्य करावयातें. २.
तूं कीर्तिदायक जशी घडशी नृपाला
तैशी धनेंकरुनि हीन अशा जनांला
जो [1]भूप तीन शतकें रचिता तयाची
तैशीच कीर्ति धनहीन [2]अभंगियाची.
वारोनी पापधीतें निगमपथजना दाविती धर्मशास्त्रें
तैशीं सारीं पुराणें अनुभवकथनें हीं महा ज्ञानपात्रें
हीं तूझीया कृतीचीं अनुपम सुफलें मानवां प्राप्त झालीं
या कर्तत्वा बघोनी तव [3]सुरवरही मान घालील खालीं. ४.
*जो उत्पन्न मनांत होउनि सदा चैतन्यरूपें वसे
जाणाया रसरूपगंध सहसा ज्याला मुळींही नसे
त्याचें चित्र सुरेख काढुनि पटीं तूं दावितेसी जना
ही युक्ती तव लाजवी निजगुणें अन्यां कलां कल्पनां. ५.

---

१भर्तृहरि. २तुकाराम. ३इंद्र. *हें वर्णन मनांतल्या विचारांचें आहे.

केलेंसी अजरामर क्षितिवरी[1] त्वां व्यासवाल्मीकियां
तैसें अन्य जनांसही तव पथें जे लागले जावया
जोडोनी कर दोनही बहु तुझे पायांस मी लागतों
दे तूझा सहवास उत्तम सदा हें मागणें मागतों. ६.

---

## कल्याणकारक दुःख.

परमेश्वरानें विश्वाची रचना अशी चमत्कारिक केली आहे कीं, तींतल्या कोणत्याही वस्तूकडे विचारपूर्वक पाहिलें असतां मनुष्यास कांहीं तरी लाभ व्हावा; मग तो लाभ सुखाच्या रूपानें होवो, किंवा दुःखाच्या रूपानें होवो.

आकाश, प्राणी, फुलें, फळें, इत्यादिकांची शोभा पाहून अंतःकरणास आल्हाद होतो; ह्या लाभाचा अनुभव, अगदीं लहान मुलांपासून प्रौढांपर्यंत सर्वांस थोडाबहुत तरी आहे; ह्मणून त्याविषयीं विशेष बोलण्याचें प्रयोजन नाहीं. परंतु, दुःखाच्या रूपानें लाभ होतो असें ह्मटलें आहे, तें अंमळ चमत्कारिक वाटतें; ह्मणून त्याविषयीं थोडें सांगितलें पाहिजे.

नारूनें पाय धारणासारखा मोठा झाला आहे; गंडमाळांनीं गळा वेढला आहे; डोळे आल्याचें निमित्त होऊन दिसेनासें झालें आहे; क्षयानें आंगांतलें सगळें रक्तमांस नाहींसें होऊन नुसतीं हाडें राहिलीं आहेत; अथवा महारोगाची व्याधि प्रबल होऊन, तिच्या योगानें हातपाय झडून चालले आहेत; असे नानाप्रकारचे रोगी मोठ्या दवाखान्यामध्यें नित्य दृष्टीस पडतात; आणि

---

१ पृथ्वीवर.

त्यांची ती अवस्था पाहून मनास फार दुःख होतें. तरी, तें दुःख लाभदायक आहे. तें किती ह्मणाल तर, सुंदर आणि चमत्कारिक वस्तु पाहून जो आल्हाद होतो, त्यापेक्षां तें दुःख फार लाभदायक होतें. तें असें. सुंदर आणि चमत्कारिक वस्तूंपासून जो आल्हाद होतो, त्याच्या योगानें तेवढ्या वेळापुरतें मात्र मनास सुख होतें; त्यापासून बोध घेण्यास विशेष असें त्यामध्यें कांहीं वाटत नाहीं. परंतु, वर सांगितलेलीं रोगग्रस्त मनुष्यें दृष्टीस पडल्यानें मनास जें दुःख होतें, त्यापासून फार उपयोगी असा बोध आपोआप प्राप्त होतो. ह्मणजे, त्यांजकडे पाहून मनांत असें येतें कीं, ह्या जगामध्यें ह्या अनंत व्याधि पसरलेल्या आहेत, आणि त्यांच्या पायीं हीं इतकीं माणसें अगदीं गाय होऊन बसलीं आहेत, त्यांतल्या एकाद्या व्याधीनें आपणांस अद्याप घेरिलें नाहीं, ही केवढी ईश्वरी कृपा आहे ! ज्या पापांवरून ह्या व्याधि परमेश्वरानें ह्यांच्या मागें लाविल्या आहेत, त्यांतलें एकही पाप आपले हातून घडलें नसेल काय ? नसेल असें कोणीं ह्मणावें ? बरें, जर घडलें असेल, तर तशी भयंकर व्याधि आपणांस अद्याप जडली नाहीं, हें आमच्या आंगच्या सामर्थ्याचें फल आहे काय ? नाहीं. ह्या व्याधि इतरांस जडाव्या आणि आह्मांस जडूं नयेत, असा आमचा काय अधिकार आहे ? अधिकार तर नाहींच ! पण त्या व्याधि आह्मांस गांठायास हळू हळू आह्मांकडे येत नसतील ह्मणून कशावरून ? कदाचित् येत असतील. बरें, जर त्या येत असतील, तर त्यांनीं आपणांस गांठिल्याच्या आधीं आपण यथाशक्ति धांवाधांव करावी, हें

आवश्यक आहे कीं नाहीं? पायास नारू होऊन पडल्यावर, चांगल्या कामास पळ मारण्याची हौस कशी पुरेल? डोळे गेल्यावर उत्तम पुस्तकें वाचण्याची किंवा परमेश्वरकृत विश्वसौंदर्य पहाण्याची हौस कशी पुरेल? महारोगानें वेढल्यावर, शरीरद्वारा परोपकार करण्याची हौस कशी पुरेल? नाहीं; नाहीं; नाहीं; रोगांनीं ग्रासिल्यावर ह्या सगळ्या हौसा जागचेजागीं राहतील, आणि अंतःकरण दुःखांत तळमळत ठेवून, आयुष्याचे दिवस काढावे लागतील. ह्यास्तव, आपण सुदृढ आहों तोंपर्यंत आपल्याच्यानें होईल तितकें चांगलें काम आपण करावें, हा आपला धर्म होय.

असे गंभीर विचार दवाखान्यांतले रोगी पाहून मनांत येतात; आणि त्यांच्या योगानें मनुष्यें आपल्या कर्तव्याविषयीं जागृत होऊन चांगल्या प्रकारें वागूं लागतात. हा लाभ, दुःखरूपानें होतो. अशी विश्वव्यवस्था ज्या चतुर कारागिरानें आमच्या सुखाकरितां ह्या जगांत लावून ठेविली आहे, त्याचा महिमा अगाध आहे! पंतांनीं ह्मटलें आहे:—

श्लोक.

अतर्क्य महिमा तुझा गुणहि फार ना हे विधी
श्रुतिज्ञहि ह्मणे सदा स्तविल आमुची केंवि धी
तरी जन यथामति स्तवुनि जाहले सन्मति
स्तवार्थ तुझिया तुझ्या सम कवी कधीं जन्मती.

---

## सृष्टींतल्या पदार्थांची रचना.

बुंदीचा लाडू हा कांहीं झाडाला येत नाहीं; किंवा खाणींत सांपडत नाहीं; तर तो तयार करावा लागतो.

तो तयार करायास तीन पदार्थ लागतात; हरबऱ्यांच्या डाळीचें पीठ, तूप आणि साखर. ह्मणजे, हे तीन पदार्थ मिळून तो झालेला असतो. तरी तो हातांत घेतल्यावर ते तीन पदार्थ वेगळे वेगळे दिसत नाहींत. त्याप्रमाणें, सृष्टींतल्या पदार्थांच्या रचनेविषयीं विद्वान् पुरुषांनीं कांहीं गोष्टी सिद्ध केल्या आहेत. त्यांमध्यें एक गोष्ट अशी आहे कीं, सृष्टींतले कितीएक पदार्थ अगदीं सिद्ध आहेत; ह्मणजे ते इतर पदार्थांच्या संयोगानें झालेले नाहींत; आणि बाकीचे पदार्थ मिश्र आहेत; ह्मणजे ते कितीएक सिद्ध पदार्थांच्या योगानें झालेले आहेत.

ह्यावरून, सृष्टींतल्या एकंदर सर्व पदार्थांचे वर्ग दोन झाले; एक सिद्ध आणि दुसरा मिश्र. विद्वान् पुरुषांनीं विचार करून आणि प्रयोग करून पाहून असें सिद्ध केलें आहे कीं, सृष्टीमध्यें सिद्ध असे पदार्थ अवघे पांसष्ट आहेत. त्यांपैकीं ५२ धातु आहेत, आणि बाकीचे १३ धातु नव्हत असे आहेत. सोनें, रुपें, तांबें, लोखंड, शिसें, कथील, पारा, जस्त, सोमल, इत्यादि पदार्थ हे, धातुमय सिद्ध पदार्थांचीं उदाहरणें होत; आणि गंधक, हिरा, कोळसा, इत्यादि पदार्थ हे धातु नव्हत अशा सिद्ध पदार्थांचीं उदाहरणें होत. त्याप्रमाणें ह्या पांसष्टांपैकीं, अठ्ठावन सिद्ध पदार्थ सोन्यारूप्यासारखे अप्रवाही, भरींव आहेत; पारा व ब्रोमाइन हे दोन पाण्यासारखे पातळ आहेत; आणि आक्सिजन, हैड्रोजन, नैट्रोजन, फ्ल्युओराइन आणि क्लोराईन हे पांच वायुरूपी आहेत. हे शेवटचे पांच शब्द इंग्रेजी आहेत. त्यांस अगदीं बरोबर अशा अर्थाचे मराठींत शब्द नाहींत. आणि आतां

नवीन केले तर ते इंग्रजी शब्दांइतकेच कठिण होणार. मग त्यांत लाभ तो कोणता? ह्मणून हे आहेत तसेच कायम ठेवावे, आणि त्यांस मराठी शब्दांच्या मंडळींत घ्यावें हें बरें दिसतें. सहवासानें, कांहीं वर्षांनीं ते मराठी वाटूं लागतील. नंबर, टेबल, तिजोरी, बूक, हे शब्द इंग्रजी असून ते आतां अगदीं मराठी झाले आहेत. तसेंच कांहीं काळानें ह्या वरच्या शब्दांचें होणार आहे. मग वृथा शीण कां करावा?

आतां, वर सांगितलेल्या सृष्ट सिद्धपदार्थांपैकीं ह्मणजे तत्त्वांपैकीं कितीएकांच्या मिश्रणानें व्यवहारांतल बहुतेक पदार्थ झाले आहेत. त्यांविषयीं प्रयोग करून विद्वान् पुरुषांनीं त्यांची प्रतीति पाहिली आहे. तेव्हां त्यांविषयीं शंका नाहीं. अशा प्रकारचीं कांहीं उदाहरणें येथें मासल्याकरितां सांगतों.

**खडू.**— हा क्याल्शिअम् धातु, कार्बान् व आक्सिजन वायु मिळून झाला आहे.

**चुना.**— हा आक्सिजन वायु आणि क्याल्शियम् धातु मिळून झाला आहे.

**जंग.**— हा आक्सिजन वायु आणि लोखंड मिळून झाला आहे.

**टांकणखार.**— हा आक्सिजन वायु, सोडियम् धातु आणि बोरान धातु, हे मिळून झाला आहे.

**तुरटी.**— ही आल्युमिनिअम् धातु, पोट्याशिअम् धातु, आक्सिजन वायु, व गंधक हे मिळून झाली आहे.

**नवसागर.**— हा नैट्रोजन वायु, हैड्रोजन वायु, आणि क्लोराइन वायु मिळून झाला आहे.

**पाणी.**— हें आक्सिजन वायु, आणि हैड्रोजन वायु मिळून झालें आहे.

**पेवडी.**— ही क्रोमिअम् धातु, आक्सिजन वायु, व शिसें मिळून झाली आहे.

**पापडखार.**— हा आक्सिजन वायु, कार्बान, आणि सोडियम् धातु हीं मिळून झाला आहे.

**मनशील.**—हा सोमल व गंधक मिळून झाला आहे.

**मीठ.**— हें क्लोराइन वायु, आणि सोडिअम् हीं मिळून झालें आहे.

**मुरदाडशिंग.**— हें शिसें आणि आक्सिजन वायु मिळून झालें आहे.

**मोरचूद.**— हें तांबें, गंधक आणि आक्सिजन वायु मिळून झालें आहे.

**रसकापूर.**— हा पारा आणि क्लोराइन मिळून झाला आहे.

**शेंदूर.**— हा आक्सिजन वायु, आणि शिसें मिळून झाला आहे.

**सफेद मोरचूद.**— हा पदार्थ जस्त, गंधक, व आक्सिजन वायु मिळून झाला आहे.

**सफेता.**— हा आक्सिजन वायु, शिसें आणि कार्बान हीं मिळून झाला आहे.

**सोरा.**—हा पोट्याशिअम् धातु, नैट्रोजन वायु, आणि आक्सिजन वायु मिळून झाला आहे.

**हरताळ.**—हा सोमल व गंधक मिळून झाला आहे.

**हिंगूळ**—हा पारा आणि गंधक मिळून झाला आहे.

**हिराकस.**—हा आक्सिजन वायु, गंधक आणि लोखंड मिळून झाला आहे.

ह्या गोष्टी इतक्या खऱ्या आहेत कीं, यंत्रांच्या साह्यानें त्या प्रत्यक्ष करून दाखवितां येतात. आक्सिजन वायु आणि हैड्रोजन वायु हे एकत्र करून त्यांपासून प्रत्यक्ष पाणी उत्पन्न करितां येतें. हे सगळे विद्यामंदिरांतले चमत्कार आहेत. ते समजले ह्मणजे मोठा आनंद होऊन अनेक लाभ होतात.

---

## लेखणी आणि तरवार.

ह्या दोन वस्तु पाहिल्या असतां अगदीं लहान दिसतात. त्यांचे ठायीं स्वतःची शक्ति मुळींच नाहीं. परंतु, ह्या जगांमध्यें ज्या फार मोठ्या घडामोडी होतात, त्यांत ह्यांचा जितका पराक्रम असतो, तितका दुसऱ्या कोणत्याही वस्तूचा नसतो.

मोठ्या घडामोडींत मोठी घडामोड ह्मटली ह्मणजे राज्यांची उलथापालथ होय. तींत मुख्य कर्तृत्व काय तें ह्या दोघींचें असतें. हें स्पष्ट कळण्यास इतिहासांतल्या गोष्टी घेतल्या पाहिजेत. छत्रपति शिवाजी महाराज आणि लार्ड क्लैव्ह हे दोन पुरुष, राज्य स्थापण्याच्या संबंधानें पाहिलें असतां, मोठे नामांकित होऊन गेले. ह्यांच्या चरित्रांवरून असें दिसतें कीं, छत्रपति शिवाजी महाराजांस मोठें होण्यास मुख्य आधार तरवारीचा होता, आणि लार्ड क्लैव्ह ह्यांस मोठें होण्यास मुख्य आधार लेखणीचा होता. एकानें आपला हेतु तरवारीनें साधिला, एकानें लेखणीनें साधिला. हेतु साधण्यांत दोघे सारखेच; पण, त्यांत श्रेष्ठ कोण? छत्रपति किं लार्ड?

ह्याच्या विचारांत दोघांच्या चरित्रांतली एक एक

मुख्य गोष्ट घेऊं. छत्रपति शिवाजी महाराजांनीं अफजूलखानास मारिलें, ही एक गोष्ट; आणि खोट्या करारनाम्यावर लार्ड क्लैव्ह ह्यानें आडमिरल वाटसन ह्याची सही करून, उमीचंदास फसवून, प्लासीच्या लढाईचा घाट बनवून आणिला, ही दुसरी गोष्ट. ह्या दोन्ही गोष्टींनीं राज्याच्या उलटापालटी झाल्या आहेत. ह्मणजे दोहोंचाही परिणाम एकसारखा झाला आहे. परंतु, शत्रूस तरवारीनें मारणें, आणि शत्रूस मारण्याकारितां खोटा कागद करणें, ह्यांतली कोणती गोष्ट शूर मनुष्यास शोभण्यासारखी आहे बरें! पुढें परिणाम कांहींही होवोत; परंतु, आपल्या शत्रूस मारण्याकारितां लार्ड क्लैव्ह ह्यानें खोटा कागद केला, हें काम त्यानें केवळ भागूबाईचें आणि निर्लज्जपणाचें केलें, असें अभिमानी इंग्लिश ग्रंथकार देखील कबूल करितात, आणि लाजतात. मग तसें इतरांनीं ह्मणावें ह्यांत काय नवल आहे!

लार्ड क्लैव्ह ह्यापेक्षां छत्रपति शिवाजी महाराज श्रेष्ठ.

---

## अतिलोभाचा परिणाम.

### ओंव्या.

सिंह निद्रिस्त पाहूनि वदन, दशनीं[1] अडकले मांसकण,
त्यांचें करावया भक्षण, मुखामाजी पक्षी प्रवेशे. १.
तें मांस भक्षिलिया सकळ, शेखीं[2] शाहणा नोहेचि बरळ[3],
जिव्हां सुरंग मृदु मवाळ[4], ह्मणऊनि झोंबे भक्षावया. २.
चंचू लागतां तीक्ष्ण, सिंहें मिळविलें वदन,
ग्रास झाला तेव्हां ज्ञान, फळा आलें तयाचें. ३.

मुक्तेश्वर.

---

१ दातांत. २ शेवटीं. ३ भुललेला. ४ मऊ.

# बालबोध.



## जहांगीर बादशाहा.



राजकुलामध्यें कांहीं पुरुष असे उत्पन्न होतात कीं, त्यांस वैभव संपादण्यास पुष्कळ कष्ट करावे लागतात; ह्मणून त्यांस स्वस्थपणें राज्यसुखाचा उपभोग घेण्यास अवकाश सांपडत नाहीं. शिवाजीमहाराज, बाबर, अकबर, पीटर धि ग्रेट हे पुरुष ह्या प्रकारचे होत. आणि राजकुलामध्यें कांहीं पुरुष असे उत्पन्न होतात कीं, वडिलोपार्जित विपुल वैभव जरी प्राप्त झालेलें असलें, तरी, स्वतःच्या ढिलेपणामुळें, गृहकलहामुळें आणि दरबारच्या खटपटींमुळें, स्वस्थपणा नाहींसा होऊन, त्यांस नानाप्रकारचीं संकटें सोसावीं लागतात. मोंगल वंशांतला चवथा बादशहा जहांगीर हा पुरुष ह्या प्रकारचा होता. त्याचा वृत्तांत येथें सांगतों.

अकबर बादशहा इ० स० १६०५ ह्या वर्षीं मरण पावला, आणि त्याच्या गादीवर त्याचा मुलगा सेलीम हा बसला. तो आपणास जहांगीर ह्मणवूं लागला. "जहांगीर" ह्या शब्दाचा अर्थ "जग जिंकणारा" असा आहे. हें नांव त्याला सहज घेतां आलें; परंतु, बावीस वर्षांच्या कारकीर्दींत एक देखील नवीन प्रांत त्याला जिंकितां आला नाहीं. बोलणें सोपें, करणें कठीण.

जहांगिराचा वडील मुलगा खुशरू, हा आपल्या बापाशीं पहिल्यापासून वांकडा झाला होता. त्यास आणि त्याच्या लोकांस बादशहानें पकडिलें; आणि त्यांतले ७०० लोक, एका ओळीनें एकदम सुळांवर चढवून, ते त्यानें खुशरूस दाखविले. पुढें खुशरू प्रतिबंधांतच मरण पावला.

अहमदनगरचें राज्य घेण्याकरितां बादशहानें आपला दुसरा मुलगा परविज ह्यास सैन्य बरोबर देऊन दक्षिणेंत पाठविलें होतें; परंतु, त्या राज्याचें रक्षण मलिकंबर ह्या प्रधानानें उत्तम प्रकारें केल्यामुळें, परविज ह्याचें कांहीं चाललें नाहीं. परंतु, पुढें तें राज्य राजपुत्र शहाजहान ह्यानें घेतलें.

जहांगीर बादशहानें, सीरअफकून नामक एका सरदारास ठार मारून, त्याची बायको नूरजहान हिजशीं आपलें लग्न लाविलें. ती त्याची पट्टराणी झाली. तिचें नांव त्यानें नाण्यांवर घालविलें. तिच्या बापास आणि भावास त्यानें राज्यांतलीं फार मोठीं कामें सांगितलीं. तो तिच्या हातानें पाणी पिऊं लागला. तेव्हां नाकापेक्षां मोतीं जड होऊन, दरबारांत फळ्या पडल्या; आणि

मोहबतखान ह्या सरदारानें बंड केलें. तें एवढें कीं, त्यानें बादशहा आणि त्याची राणी ह्या दोघांसही कांहीं दिवस प्रतिबंधांत ठेविलें होतें. पुढें तें बंड नूरजहान हिनें मोडिलें.

अशा प्रकारें गडबडींत आणि संकटांत बहुतेक सर्व कारकीर्द सरून, जहांगीर हा इ० स० १६२७ह्या वर्षीं काश्मिराहून लाहोरास जात असतां, वाटेंत मरण पावला.

ह्या बादशहाच्या दरबारीं इंग्लंडच्या राजाकडचा वकील सर थामस रो हा आला होता. त्याचा त्यानें चांगला आदरसत्कार केला; आणि त्यानें आणलेले नजराणे मोठ्या संतोषानें घेतले.

जहांगीर हा बादशहा अत्यंत विषयी आणि मद्यपी होता. त्यामुळें त्याच्या राज्यांत आणि दरबारांत पुष्कळ बखेडे होऊन, त्यांचीं फळें त्यास भोगावीं लागलीं. त्याजपाशीं संपत्ति पुष्कळ असून तिच्या मानानें त्याला सुख झालें नाहीं.

तरी तो न्यायी होता. गरीबगुरीबांची दाद आपणाजवळ लागावी, आणि दरबारच्या लोकांनीं मध्यें लुच्चेपणा करूं नये, ह्मणून त्यानें, आपल्या बसावयाच्या खोलींत सोन्याची एक मोठी घांट बांधून, तिच्या लोळ्याची दोरी, अगदीं खालच्या मजल्यावर उघड्या जाग्यावर आणून ठेविलेली होती, ती हालविल्यावर ती घंटा वाजे; आणि तेवढ्या सूचनेवरून बादशहा खालीं येऊन गरीबगुरीबांचे अर्ज घेत असे, व त्यांचा निकाल यथायोग्य रीतीनें करीत असे. ही गोष्ट राजेरजवाड्यांस कित्ता घेण्यासारखी आहे.

ह्यानें आपल्या राज्यव्यवस्थेकरितां १२ मुख्य नियम केले होते. त्यांतल्या पांचव्या नियमांत त्यानें असें ह्मटलें आहे कीं, “मी स्वतः जरी पुष्कळ दारू पितों, तरी मी ती लोकांस पिऊं देणार नाहीं; कां कीं तिचा परिणाम वाईट आहे.” ह्यांत स्वतःच्या कल्याणापेक्षां प्रजेच्या कल्याणाकडे त्याचें लक्ष विशेष दिसतें. हा तरी सद्गुण कांहीं लहान नव्हे !

---

## जनांस वृद्ध पुरुषाचा बोध.

### आर्या.

होतों लहान तेव्हां आयकिलें वचन मायबापांचें
त्यासारखें सुखावह नाहीं जगतांत या दुजें साचें. १.
खायास अन्न पुष्कळ अंगभरी वस्त्र पांघरायाला
उत्तमपुस्तकसंग्रह सद्गुरु विद्या तशी करायाला. २.
हें त्यांहीं मज देउनि निज अनुभव अनुपमेय सांगितला
नाहीं तथापि त्याच्या बदला एकहि छदाम मागितला. ३.
त्यांचा बोध अनुत्तम अंतःकरणांत सर्व सांठविला
करितां समस्त कार्यें परमेश्वर निजमनांत आठविला. ४.
केली विद्या केला धंदाव्यवहार चोख रीतीनें
चित्त तसे हस्त कधीं न मळविले पातकें अनीतीनें. ५.
वदलों सत्य निरंतर नाहीं वदलों असत्य कोणाशीं
निजपरहिताहितास्तव पापाच्या गवसलों न मी पाशीं. ६.
एक मनीं एक जनीं नाहीं केलें असें कधीं पाप
मद्बुद्धिदेवतेनें नाहीं मजला दिला कधीं शाप. ७.
सत्याचरणीं धरिली कोणाचीही कधीं न मीं परवा
चित्तस्वास्थ्य जहाला हा त्याचा लाभ कीं मला बरवा. ८.
सत्याश्रयें सुखानें गेले दिन बहुत राहिले थोडे

ते घालवीन ऐसे कीं शेखीं[1] मुक्तिपद मला जोडे. ९.
इहलोकवास आहे क्षणभंगुर यांत गुंतणें खोटें
हें चित्तांत धरोनी मी करितों काम सान कीं मोठें. १०.
परमेश्वरीं भरंवसा धरोनियां वागतों जनांमाजी
तेणें असें जगाया तसा मरायास मी सदा राजी. ११.
जनहो या रीतीचा घ्यावा अनुभव तुम्हीं धरुनि भाव
ही साधूनीं केली भवसागरपार जावया नाव. १२.

---

## पुरता अनुभव घ्यावा आणि मग अभिप्राय द्यावा.

कोणत्याही गोष्टीला बरें वाईट ह्मणणें तें चांगला विचार करून आणि पुरता अनुभव घेऊन ह्मटलें पाहिजे. नाहीं तर, चांगल्यास वाईट आणि वाईटास चांगलें एकदा ह्मणून चुकल्यावर, त्याच्या उलट बोलण्यास लाज वाटते.

कोणी एक प्रवासी एका मोठ्या रेताड मैदानांतून, आग कोसळत होती, अशा उन्हांतून चालला होता; त्याचा जीव घाबरा झाला होता; आणि तो कोठें थोडी छाया मिळेल ह्मणून इकडे तिकडे पहात होता. इतक्यांत रस्त्यापासून कांहीं अंतरावर एक हिरवाचार वृक्ष त्याच्या दृष्टीस पडला. तेथें धांवत धांवत जाऊन, त्याच्या गार छायेंत तो बसला, आणि फार समाधान पावून ह्मणाला, "वृक्षा, तूं धन्य आहेस; तूं मोठा परोपकारी आहेस; आज माझा जीव तूं वांचविलास, ह्मणून मी तुझे फार उपकार मानितों." आंगांतला ताप शांत झाल्यावर त्याला भूक लागलीशी वाटली, आणि, इकडे तिकडे

---

१. शेवटीं.

पहात असतां, त्याची दृष्टि सहज त्या झाडावर गेली; आणि तेथें त्याला पांच चार सुंदर फळें दिसलीं. परंतु, त्याला झाडावर चढतां येत नव्हतें, आणि, त्यानें तीं पाडण्यास शेंपन्नास दगड मारिले, तरी तीं फळें पडलीं नाहींत. तेव्हां, किंचित् संतापून तो त्या वृक्षास ह्मणाला, "अरे अदत्ता, चांडाळा! तुला देवानें फळें दिलीं आहेत, तीं ठेवण्याकरितां दिलीं आहेत काय? तुजपाशीं माझी क्षुधा शांत करण्याची सामुग्री सिद्ध असून, तूं असा मठ्ठ होऊन बसलास आहेस, त्यापेक्षां तुजसारखा अधम ह्या जगांत दुसरा कोणी नाहीं. तुला धिक्कार असो." तो अशा शिव्या देत होता, इतक्यांत एक मोठा वाऱ्याचा सोंसाटा आला, आणि त्यासरसें सगळें झाड हालून, तीं फळें त्या मनुष्याच्या पायांशीं पडलीं. तीं त्यानें उचलिलीं, आणि खाल्लीं. तीं त्याला इतकीं गोड लागलीं कीं, तो ह्मणाला, "वृक्षा, तुझें नांव मला ठाऊक नाहीं; तरी, तुझ्या फळांच्या रुचीवरून, मी तुला अमृततरु ह्मणतों. मी मघाशीं तुला कठोर शब्द बोललों, ह्याची क्षमा तूं मला कर. तुझीं फळें खाऊन मला फार संतोष झाला आहे. आणि अशा संकटाच्या वेळीं तूं मला साह्य केलेंस, ह्मणून मी तुझे फार फार उपकार मानितों; हे उपकार मी कधीं विसरणार नाहीं." ह्याप्रमाणें त्याचें बोलणें पुरतें झालें नाहीं तोंच, त्याच्या आंगाची अतिशयित आग होऊं लागली, पोटांत कालमेल झालें, आणि एकीमागून एक अशा इतक्या उलट्या त्याला झाल्या कीं, शेवटीं त्याच्या तोंडांतून रक्ताच्या गुळण्या पडल्या. तेव्हां, कंठीं प्राण येऊन, तो तेथें जमिनीवर गडबडां

लोळूं लागला, आणि त्वेषानें ह्मणाला, "अरे वृक्षा, मायावी राक्षसा, विश्वासघातक्या, तूं अशा रीतीनें आजपर्यंत किती लोकांच्या माना कापिल्यास आहेस-रे! धिक् तुझें जिणें! थू तुझ्या तोंडावर! अरे साधूचें स्वरूप घेऊन चांडाळाचें कर्म करावें काय? कांहीं चिंता नाहीं. मी जर ह्यांतून निभलों, तर, तुझा समूळ नाश केल्यावांचून कधींही रहाणार नाहीं. तुझी मुळीनमुळी खणून टाकीन." अशा प्रकारें बडबडत असतां, आणि लोळत असतां, त्या गार सावलींत त्याचा किंचित् डोळा लागला. तेव्हां त्याला जरा बरें वाटलें; आणि तो सावध होऊन, आंग झाडून, बसला राहून पाहूं लागला तों, जी रक्तपिती त्याला बारा वर्षेपर्यंत जडली होती, आणि जिच्या पायीं कितीएक वेळां तो आत्महत्या करून घेण्यास देखील तयार झाला होता, ती त्याची रक्तपिती, आंगांतून सगळी नाहींशी झाली आहे, आणि अंगाची कांति लिंबासारखी झाली आहे, असें त्याच्या दृष्टीस पडलें! मग काय विचारावें! तो, हात जोडून, आणि मान खालीं घालून, त्या वृक्षाच्या पायां पडून ह्मणाला, "तरो, आपण खरोखर अमृततरु आहां. म्या पामरानें आपली व्यर्थ निंदा केली. मी अ-पराधी आहें. मला क्षमा करावी. मी आपले उपकार कधीं विसरणार नाहीं."

असें वारंवार बदलणें हें विचारी मनुष्यास शोभत नाहीं. ह्मणून, **पुरता अनुभव घ्यावा; आणि मग अभिप्राय द्यावा,** हा उत्तम मार्ग होय.

---

## ग्रहणें.

एकाद्या पौर्णिमेच्या रात्रीं कांहीं वेळपर्यंत चंद्रास डाग पडल्यासारखा दिसतो, आणि एकाद्या अमावास्येच्या दिवशीं कांहीं वेळपर्यंत सूर्यास डाग पडलेला दिसतो, त्यास ग्रहण असें ह्मणतात. चंद्रास डाग पडला ह्मणजे त्याला चंद्रग्रहण ह्मणतात, आणि सूर्यास डाग पडला म्हणजे त्याला सूर्यग्रहण ह्मणतात.

हीं ग्रहणें होण्यास तीन वस्तु मुख्यत्वेंकरून कारणीभूत असतात; सूर्य, चंद्र, आणि पृथ्वी. ह्यांपैकीं, सूर्य प्रकाशवान् आहे, आणि चंद्र व पृथ्वी हीं निस्तेज आहेत; आणखी, चंद्र जो प्रकाशमान दिसतो, तो, त्यावर सूर्याचे किरण पडल्यामुळें दिसतो; ही एक गोष्ट, ग्रहण बरोबर समजण्यास लक्षांत ठेविली पाहिजे.

दुसरी एक गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे. ती ही कीं, सूर्यास ग्रहण लागणें ह्मणजे सूर्यावर खरोखर डाग किंवा अंधेर पडणें नव्हे; तर, दुसरी वस्तु आमच्या दृष्टीच्या आड येऊन, त्याचा कांहीं भाग दिसेनासा होणें होय; आणि ती आड येणारी वस्तु ह्मणजे चंद्र होय. आणि चंद्रास ग्रहण लागणें ह्मणजे, त्यास प्रकाशमान करण्यास सूर्याचे किरण जात असतां, त्यांतल्या कितीएकांच्या आड एकादी वस्तु येऊन, चंद्राच्या तितक्या भागावर सावली किंवा डाग पडणें हें होय; आणि ती आड येणारी वस्तु ह्मटली ह्मणजे पृथ्वी होय.

तिसरी एक गोष्ट लक्षांत ठेवावयाची ह्मटली ह्मणजे ही आहे कीं, सूर्यग्रहण किंवा चंद्रग्रहण जें आहे, तें, सूर्य, चंद्र आणि पृथ्वी हीं तिन्ही एका सरळ ओळींत

आल्यावांचून होत नाहींत; आणि, पृथ्वी ही सूर्यासभों-वतीं ३६५ दिवसांत एक प्रदक्षिणा करिते, आणि, तिची ती फेरी चालली असतां, तिच्या सभोंवतीं, चंद्र हा ३० दिवसांत एक प्रदक्षिणा करितो; असा प्रकार एकसारखा चालला असतां, त्या क्रमांत, हीं तिन्ही एका ओळींत येतात, तेव्हां ग्रहणें होतात.

सूर्यग्रहणाच्या वेळीं त्यांची स्थिति अशी असतेः—



सूर्य. . . . . . चंद्र. पृथ्वी.

चंद्रग्रहणाचे वेळीं त्यांची स्थिति अशी असतेः—



सूर्य. . . . . . पृथ्वी. चंद्र.

अशा प्रकारें ग्रहणें होतात. ही गोष्ट इतर राष्ट्रांत-ल्या लोकांस नवी वाटते. परंतु, ती आमच्या ह्या राष्ट्रां-तल्या लोकांस पुष्कळ वर्षांमागें कळलेली आहे, असें प्राचीन ग्रंथांवरून स्पष्ट दिसून येतें. ग्रहणांच्या कार-णांचा उल्लेख ऋग्वेदसंहितेंत आढळतो. त्या ग्रंथाइतका जुना ग्रंथ साऱ्या पृथ्वींत दुसरा एकही नाहीं. शालिवाहन शके ३९७त ह्मणजे इ० स० ४७५त पाटणा येथें आर्यभट्ट हा जन्मला. त्यानें शा० श० ४२१त ह्मणजे इ० स० ४९९त आर्यभट्टीय ह्मणून एक ज्योतिषग्रन्थ लिहि-

ला. त्यात त्यानें वर सांगितलेलीं ग्रहणांचीं कारणें, बहुतकरून बिनचूक रीतीनें, प्रदर्शित केलीं आहेत. पुढें पाऊणशें वर्षांनीं उज्जनीस **वराहमिहिराचार्य** हा एक मोठा ज्योतिषी झाला. त्याच्या बृहत्संहितानामक ग्रंथांतही तींच कारणें सांगितलीं आहेत. नंतर सुमारें पांचशें वर्षांनीं बीड येथें **भास्कराचार्य** ह्मणून एक मोठा ज्योतिषी झाला. त्यानें शा० श० १०७२त ह्मणजे इ० स० ११५०त सिद्धांतशिरोमणि हा ग्रंथ लिहिला. त्यांतही ग्रहणांचीं कारणें तींच सांगितलीं आहेत. त्यानंतरचे आमचे ज्योतिषी नांदगांवचे **गणेश दैवज्ञ**. त्यांचा ग्रंथ ग्रहलाघव हा, शा० श० १४४२त ह्मणजे, इ० स० १५२०त झाला. त्यांतही तींच कारणें वर्णिलीं आहेत. ह्यावरून ह्या कठिण गोष्टी आमच्या राष्ट्रांतल्या लोकांस किती प्राचीन काळापासून माहीत होत्या, तें स्पष्ट दिसून येतें.

कोणत्याही वर्षीं सूर्यग्रहणें आणि चंद्रग्रहणें, सगळ्या पृथ्वींत, एकंदर मिळून, सातांहून अधिक पडत नाहींत, व दोहोंहून कमी पडत नाहींत.

ह्या ग्रहणांच्या गोष्टी गणितानें अगदीं बिनचूक रीतीनें आधीं शेंकडों वर्षें सांगतां येतात. तेव्हां, त्या गणिताच्या खरेपणाविषयीं संशय घेण्यास कारण नाहीं. ह्मणून, त्यावरून सिद्ध झालेल्या कारणांवर विश्वास ठेवून, त्यांविषयींच्या वेड्या वेड्या समजुती टाकून द्याव्या. ह्मणजे, त्यांत, सर्प, राक्षस, देव, दैत्य ह्यांचा कांहींएक संबंध नाहीं, असें पक्कें समजावें. खरें असावें एक, आणि समजावें भलतेंच, हेंच अज्ञान. तें सोडून द्यावें.

## पापाचा बाप कोण? लोभ.

मनुष्याच्या ठायीं केवढालेही मोठे गुण असोत; पण त्यांमध्यें जर सत्यशीलता नाहीं, आणि पापाची भीति नाहीं, तर त्या सगळ्या गुणांची मृत्तिका होते. ते गुण त्याच्या हितास कारण होत नाहींत, एवढेंच केवळ नव्हे. तर ते उलटे त्याच्या नाशास कारण होतात;—त्याचा प्राण घेतात.

शिकंदर बादशहाच्या वेळेस अथेन्स शहरामध्यें डिमास्थिनीज ह्या नांवाचा एक मोठा नामांकित वक्ता आणि विद्वान पुरुष होऊन गेला. त्याचें भाषण ह्मणजे शुद्ध जादू असे; ह्मणजे, त्याचे बोलण्याचें सामर्थ्य एवढें होतें ह्मणून लिहिलें आहे कीं, त्यानें श्रोत्यांस एका क्षणांत अगदीं आपलेसारखें करून घ्यावें. तो, शिकंदर बादशहास एक मोठा शत्रु वाटत असे; कां कीं, तो, आपल्या भाषणांनीं, अथेन्सकरांस त्याशीं लढण्याचें स्फुरण आणीत असे. परंतु, लोभानें त्याच्या निर्मल कीर्तिवर काजळाचा हात फिरविला. त्यानें, शिकंदराचा सरदार हरपालस ह्यापासून पुष्कळ द्रव्य घेतलें; आणि, आपल्या जन्मभूमीचें हित करण्याचें काम सोडून दिलें, हें बाहेर फुटल्यावर लोकांत त्याची पराकाष्ठेची फजीती झाली. ती इतकी कीं, शेवटीं त्याला देशत्याग करावा लागला. ह्मणजे, त्याला द्रव्य मिळालें, परंतु, त्याच्या पायीं तो आपल्या देशास आणि कुटुंबसुखास जन्माचा अंतरला! फार मोठी हानि! पण ती एवढ्यांत आटपली नाहीं. त्याला आत्महत्या करून घ्यावी लागली! कितीएकांस असें वाटतें कीं, ही त्याची सगळी हानि त्याच्या आंगच्या वाक्चा-

तुर्यानें झाली. परंतु, आह्मी ह्मणतों, वाक्चातुर्य हा चांगला गुण आहे; त्यापासून हानि अशी कधीं कोणाची व्हावयाची नाहीं. तर त्याची ही जी हानि झाली, ती, त्या चांगल्या गुणाचा असद्व्यय केल्यामुळें झाली; आणि तो असद्व्यय करण्याची बुद्धि होण्यास कारण द्रव्यलोभ.

तर मग ह्याविषयीं सावध असावें. ज्या द्रव्यलोभानें डिमास्थिनीजासारखे गुणवंत पुरुष धुळीस मिळविले, त्याच्या पुढें इतर साधारण माणसांचा पाड काय? असा प्रसंग आला ह्मणजे मनांत ह्मणावें कीं, हा पैसा माझ्या बरोबर यावयाचा नाहीं; पण ह्याच्या संपादनार्थ जो कोळसा मी उगाळतों आहें, त्यानें माझें तोंड जनांत निरंतर काळें होऊन राहील; आणि शिवाय देवाच्या घरचा दंड तो वेगळाच; ह्मणून ह्या भरीस पडूं नये. राज्यकारभारांत घोळणाऱ्या मंडळीस असे प्रसंग फार येतात. त्यांनीं फार जपावें; तसें, बाकीच्या माणसांनींही आपापल्या कामांत जपलें पाहिजे. पंतांनीं एके ठिकाणीं ह्मटलें आहे:—

"बुडतो सर्व बुडवितो **लोभी** क्रोधी तसाचि नर कामी."

पहा. ह्या मंडळींत लोभी आधीं, आणि बाकीचे मागून!

---

## प्रश्न.

एक संख्या आहे; तींतून एक प्राणी वजा करावा; आणि जें बाकी राहील, त्यास मन लावावें; म्हणजे त्यापासून जें कांहीं उत्पन्न होतें, तें, कार्यसिद्धीचें एक अत्युत्तम साधन होतें; तर अशी संख्या कोणती, आणि असा प्राणी कोणता?

---

# बालबोध.



## सर डेव्हिड आक्टरलोनी.



पराधीनता अत्यंत नीच मानिली आहे; ह्याचें मुख्य कारण असें आहे कीं, तिच्या पायीं, मनुष्यास आपले सगळे योग्यायोग्य विचार एकीकडे गुंडाळून ठेवून, आपल्या वरिष्ठांच्या आज्ञेप्रमाणें वागणें भाग पडतें. आणखी त्यांत, मनुष्य तेजस्वी आणि न्यायानें वागणारा असला, ह्मणजे त्याला असला प्रसंग शुद्ध मरणमूळ होतो. सर डेव्हिड आक्टरलोनी ह्याची अवस्था अशी झाली. त्याची गोष्ट अशी.

सर डेव्हिड आक्टरलोनी हा इ० स० १७५७ ह्या वर्षीं अमेरिका खंडांत बास्टन ह्या शहरीं जन्मला. तो सत्रा वर्षांचा झाल्यावर ईस्ट इंडिया कंपनीची एक लहानशी चाकरी पतकरून हिंदुस्थानांत आला. तो

जात्या मोठा बुद्धिवान् आणि चलाख होता. तो आपल्या कर्तबगारीनें चढत चढत बराच मोठा सरदार झाला, आणि गुरखे लोकांशीं इंग्लिश सैन्यानें ज्या लढाया मारिल्या, त्यांत ह्यानें आपलें शौर्य पुष्कळ प्रकट केलें. तेव्हां त्याची फार वाहवा झाली. पुढें त्याला दिल्ली येथें रेसिडेंट नेमिलें. तें काम मोठ्या जबाबदारीचें आणि वजनदारीचें होतें. कां कीं, त्याच्या ताब्यांत कितीएक लहान मोठीं संस्थानें होतीं; आणि त्यांच्या संबंधानें सगळी व्यवस्था त्यास पहावी लागत असे. त्या संस्थानांमध्यें भरतपुर ह्मणून एक रजपूत संस्थान होतें. तेथें बलदेवसिंग ह्मणून एक राजा राज्य करीत होता. तो इ० स० १८२४ ह्या वर्षीं मरण पावला. त्याच्या आधींच कांहीं दिवस त्यानें सर डेव्हिड आक्टरलोनी ह्यास विनंती करून, आपल्या मागें आपल्या लहान मुलानें सिंहासनारूढ व्हावें, आणि त्याचें रक्षण इंग्लिश सरकारानें करावें, अशी तजवीज करून ठेविली होती; कां कीं, दुर्जनसाल ह्मणून जो त्याचा चुलतभाऊ होता, तो गादी मिळविण्याकरितां भगीरथ प्रयत्न खचीत करील, हें त्याला ठाऊक होतें. त्याप्रमाणें सगळा योग आला. तो असा. बलदेवसिंगाच्या मुलास गादीवर बसवून फार दिवस लोटले नाहींत तोंच, दुर्जनसालानें त्याला पदच्युत करून गादी बळकाविली. हें दिल्लीस सर डेव्हिड आक्टरलोनी ह्यास समजतांच, सरकाराची मंजुरी येण्याची वाट न पाहतां, दुर्जनसालावर स्वारी करण्याकरितां सैन्याची सर्व सिद्धता त्यानें केली. त्याचा मुख्य हेतु एवढाच होता कीं, ज्या बाळराजास आपण राज्या

असें कबूल केलें आहे, त्याचें रक्षण करणें हें आपलें कर्तव्य आहे; परंतु, हा विचार गव्हरनरजनरल ह्यांस पसंत पडला नाहीं. कां कीं, एतद्देशीय संस्थानांच्या कामांत हात न घालणें हेंच कायतें राज्यव्यवस्थेचें मुख्य तत्त्व आहे, असें तेव्हां सरकाराच्या मनांत भरलें होतें. तुह्मांस भरतपुरच्या प्रकरणांत पडण्याचें कांहींएक कारण नाहीं, असें गव्हरनरजनरलाकडून सर डेव्हिड आक्टरलोनी ह्यास नुसतेंच लिहून आलें नाहीं; तर, सैन्याची तयारी केल्याबद्दल त्यास मोठा ठपका सरकारानें दिला. हा अन्यायमूलक अपमान त्या तेजस्वी पुरुषास सहन झाला नाहीं. त्यानें अतिशयित संतापून आपल्या येवढ्या कामाचा एकदम राजीनामा दिला. तरी, त्याला तो जो अपमानाचा धक्का अगदीं विनाकारण बसला, त्याच्या योगानें तो आजारी पडून, पुढें, थोडक्याच दिवसांनीं, मिरत येथें मरण पावला. आणखी पुढें असा चमत्कार झाला कीं, सर डेव्हिड आक्टरलोनी ह्यास जी गोष्ट सरकारानें करूं नको ह्मटलें, ती गोष्ट करणें सरकारास भाग पडलें. ह्मणजे, सैन्य पाठवून दुर्जनसालाचा पराभव त्यांनीं केला, आणि गादीवरच्या बाळराजाच्या राज्याची सर्व व्यवस्था बरोबर लावून दिली. हें किती विलक्षण आहे !

ह्या चरित्रावरून सर डेव्हिड आक्टरलोनी ह्याची तेजस्विता, आणि अन्यायाचें काम न करण्याविषयींचा दृढ निश्चय, हीं स्पष्ट दिसून येतात; तीं कित्ता घेण्यासारखीं आहेत. त्याप्रमाणेंच सरकारच्या कारभाराचें धोरण तेव्हां किती अस्थिर होतें, हेंही स्पष्ट दिसून येतें. राघोबा

दादा पेशव्यांच्या प्रकरणांत देखील हिंदुस्थान सरकाराच्या हातून असाच धरसोडीचा प्रकार झाला, असो. इतिहास हा समुद्र आहे. त्यांतलीं रत्नें तेवढीं आपण घ्यावीं, आणि दगडांकडे लक्ष देऊं नये; एवढेंच आपलें काम आहे.

---

## औरंगजेबाचा शेवटचा विलाप.

### श्लोक.

आहाहा राज्यलोभें मजकडुनि महा जाहले दोष भारी
तारुण्याच्या मदानें मति न तिळभरी राहिली कीं विचारीं
जें कोणींही न केलें अधमपण कधीं तें स्वयें सर्व केलें
पश्चात्तापाग्निनें हें हृदय तडफडे दग्ध होवोनि गेलें. १.
पूजावें म्यां जयाला सुरसम सुमनें भक्तिनें शुद्ध भावें
सोसोनी कष्ट आधीं उदित[1] निशिदिनीं मीं जयाचें करावें
त्या ताताला[2] कठोरीं शरसमवचनीं[3] ताडिलें दुष्ट वाचे
बंदी घालोनि केले नय विसरुनियां हाल भारी तयाचे. २.
ज्या बंधूंचें करावें हित झिजवुनियां देह मीं प्रेमभावें
त्यांचें मीं काय केलें हर हर न मना तें कधीं आठवावें
म्यां दुष्टानें तयांचे, नरक मज घडो, घेतले जीव हाय
व्याली माझी कशाला मज कुलगरला[4] दुःख सोसोनि माय. ३.
ज्या राज्या मेळवाया अनुपम रचिली सर्व ही पापराशी
तें झालों सिद्ध मागें त्यजुनि परजनीं टाकुनी जावयासी
आतां वाटे मनाला हळहळ सगळा व्यर्थ हा शीण झाला
हें काळें तोंड कैसें, त्वरित वद मना, दाखवूं विश्वपाला. ४.
पातकें रचुनि राज्य साधिलें
तें मला त्यजुनि येथ राहिलें
पातकें मजसवेंचि चाललीं
हाय हाय विधि[5] हा कसा बली. ५.

---

१ सांगणें. २ बापाला. ३ बाणांप्रमाणें. ४ कुलास विष अशा. ५ दैव.

विश्वेशा करुणार्णवा शरण मी आलों तुला या क्षणीं
गाजे ब्रीद तुझें जुनें अघनगांच्याही सदा रक्षणीं
तें घालोनि मदीय कर्म सगळें पोटांत साचें करीं
या दीना शरणागता लवकरी येवोनियां उद्धरीं. ६.

## ईश्वरी योजना.

कोणत्याही कामकाजांत यश येणें हें पुष्कळ अंशीं मनुष्याच्या उद्योगावर तर असतेंच; पण, त्यांतही, ईश्वरी योजना ह्मणून कांहीं एक चमत्कारिक योग असतो, असें वारंवार दृष्टोत्पत्तीस येतें.

एके वेळीं एक गलबत अमेरिकेंतल्या वेस्टइंडीज बेटांतून निघालें, तें इंग्लंडास यावयाचें होतें. बरीच मजल करून तें किनाऱ्यापासून पुष्कळ दूर, भर समुद्रांत आल्यावर, त्याच्या तळाला एकाएकीं एक मोठें भोंक पडलें, आणि त्यांतून पाणी आंत येऊं लागलें. तें इतकें कीं, ते उसपून टाकण्याची खटपट जरी सगळे खलाशी करीत होते, तरी, तें कांहीं केल्या कमी होईना, आणि, आतां गलबत बुडून सगळ्यांचा नाश खचीत होतो, असें वरच्या माणसांस वाटून, तीं, अगदीं निराश होऊन रडूं लागलीं. त्या माणसांमध्यें एक लक्षाधीश सावकार आपल्या सगळ्या संपत्तीसहवर्तमान आणि मुलांमाणसांसहवर्तमान आलेला होता; तोही, आपलीं सर्वांचीं शंभर वर्षें पुरलीं असें समजून, परमेश्वराचें नांव घेऊन, गंभीरपणानें मरण्यास तयार झाला. इतक्यांत एकाएकीं, तें पाणी आंत येण्याचें बंद झालें, आणि, एका क्षणांत गलबत पहिल्यासारखें अगदीं कोरडें होऊन पुढें चालूं ला-

६ व्रत. ७ पापपर्वत.

गलें. हें कशानें झालें, हें तेव्हां कोणास कळलें नाहीं; तेणेंकरून त्याविषयीं सर्वांस मोठा चमत्कार वाटला आणि आनंदही झाला.

तें गलबत पुढच्या मुकामाच्या बंदरीं जाऊन पोंचल्यावर पाहूं लागले तों, एक मोठा थोरला मासा, आपण होऊन आपल्या सुखाकरितां त्या भोंकांत येऊन गच्च बसला होता, त्यामुळें तें पाणी बंद झालें होतें, असें त्यांस दिसून आलें. हा चमत्कार त्या लक्षाधीश सावकाराच्या मनांत फारच भरला; आणि, त्यानें,त्या प्रसंगाच्या स्मरणार्थ, पदरच्या पैशानें एक मोठी शाळा गरीब विद्यार्थ्यांकरितां स्थापिली; आणि, तींतील विद्यार्थ्यांच्या पोषाकांवर त्या माशाच्या आकृतींची खूण असावी, असा नियम ठरविला.

त्याप्रमाणेंच दुसरा कोणीएक श्रीमंत व्यापारी गांवाहून घोड्यावर बसून घरीं जात असतां, त्यास वाटेंत इतका मोठा पाऊस लागला कीं, तेणेंकरून त्याला फार त्रास झाला; आणि देवानें एवढी अवकृपा मजवर कां करावी, असें ह्मणून तो आपणाशीं कुरकुरूं लागला. इतक्यांत, जवळच्या झाडींतून एक चोर धांवत धांवत त्याच्या जवळ आला; आणि, त्यानें आपली बंदूक त्या व्यापाऱ्यावर रोंखून चाप उडविला. त्यासरसा विस्तव तर पडला, परंतु काऱ्यावरची दारू तितक्यांत पावसाचा थेंब पडून भिजली होती, त्यामुळें, तो बार उडाला नाहीं, आणि त्या चोराचा सगळा बेत फसून, त्याला परत जावें लागलें; आणि त्या व्यापाऱ्याचा बचाव झाला. तो आपल्या घरीं गेल्यावर मनांत ह्मणाला, "पाऊस पडत होता, ही ईश्वराची अवकृपा होती, असें जें मला

वाटलें होतें, तें किती मूर्खपणाचें होतें बरें! हा जर पाऊस पडत नसता, तर, मी ह्या वेळेस मरून अरण्यांत जमीनीवर पडलों असतों, आणि माझी वाट पाहून पाहून माझीं मुलें उगाच शिणलीं असतीं. त्या पावसानें माझा जीव बांचवून, माझा पैसा वांचविला आहे. हें मी कधीं विसरणार नाहीं. आणखीं, जें काय परमेश्वर करितो, तें नेहमीं चांगलें असतें, त्यांत वाईट कधीं कांहीं नसतें, हें मी निरंतर लक्षांत ठेवीन."

अशा प्रकारच्या गोष्टींवरून मनुष्यानें प्रारब्धवादी होऊं नये. तें पाणी काढून टाकण्याचा क्रम जर खलाशांनीं ठेविला नसता, तर, तो मासा त्या भोंकांत कदाचित् येऊन बसला नसता; आणि त्याप्रमाणेंच तो बार फसल्याबरोबर घोड्यास टांच मारून तो सावकार त्या अरण्यांतून जर निघाला नसता, तर त्याला चोरानें पुनः गांठून कदाचित् ठार मारिलें असतें. ह्मणजे, उद्योगाचाही समावेश ईश्वरी योजनेंतच होतो, असें ह्मटलें तरी चालेल.

---

## आमचीं राज्यें कशानें गेलीं?

व्यवहारामध्यें जे कितीएक प्रश्न फार कठिण आहेत, त्यांतलाच हा एक आहे. तरी तो फार अगत्याचा आहे; ह्मणजे, त्याचा विचार प्रत्येक सुज्ञ मनुष्यानें करावा, असा तो आहे. ह्मणून त्याचें थोडेंसें विवेचन येथें करितों.

ह्या देशामध्यें शें दीडशें वर्षांपूर्वीं जिकडे तिकडे हिंदूंचीं किंवा मुसलमानांचीं राज्यें होतीं; तीं नाहींतशीं होऊन त्यांच्या जागीं इंग्लिश लोकांचें राज्य झालें आहे,

हें झालें तरी कसें? ह्याचें उत्तर, "दोघांचें भांडण आणि तिसऱ्यास लाभ" ह्यांत सांपडेल; ह्मणजे, त्या करितां, "दोन मांजरांनीं खवा चोरिला होता, त्याची वांटणी एका माकडानें करून दिली," ह्या गोष्टीचें स्मरण केलें पाहिजे. ह्यांचीं कांहीं उदाहरणें दिलीं पाहिजेत.

दक्षिण हिंदुस्थानामध्यें तंजावर ह्मणून एक बराच मोठा प्रांत आहे. तेथें हिंदूंचें राज्य होतें. तेथल्या गादीवर शाहूराजा होता, आणि त्याला शत्रु प्रतापसिंह हा उत्पन्न झाला. त्यांच्या कलहांत पडून, प्रतापसिंहाचा पक्ष धरून, त्यापासून, देविकोट किल्ला आणि त्याच्या भोंवतालचा प्रांत इंग्लिशांनीं मिळविला. ही गोष्ट इ० स० १७४९ त घडली.

निजामहैदराबाद येथें नासिरजंग हा गादीवर असतां, मुझफरजंग हा त्याला प्रतिपक्षी झाला. त्यांच्या कलहामध्यें पडून, नासिरजंगाचा पक्ष धरून, इंग्लिशांनीं आपला फायदा करून घेतला.

कर्नाटकचा नबाब अनवरुद्दीन ह्यास चंदासाहेब ह्या नांवाचा एक मनुष्य शत्रु उत्पन्न झाला. त्यांच्या कलहांत अनवरुद्दीनाचा पक्ष धरून, इंग्लिशांनीं बराच मुलूख मिळविला.

बंगालप्रांताचा सुभेदार सुराजउद्दवला हा दुष्ट असल्यामुळें, त्याच्या दरबारच्या लोकांनीं त्यास गादीवरून काढण्याचा कट केला. त्यांत त्याचा सेनापति मिरजाफर हा प्रमुख होता. त्या कटांत इंग्लिश लोक शिरले; आणि मिरजाफराचा पक्ष धरून, त्यांनीं आ-

पला लाग इतका साधिला कीं, पुढें थोडक्याच वेळांत तें सगळें राज्य त्यांच्या हातीं आलें.

पुण्यास पेशव्यांच्या गादीवर सवाईमाधवरावसाहेब असतां, त्यांचे चुलत आजे राघोबादादा ह्यांस राज्याची इच्छा होऊन, तें मिळवायास साह्य मागण्याकरितां ते इंग्लिश सरकाराकडे गेले. हा मूळ पाया. तेव्हांपासून, त्यांचें प्रस्थ दिवसेंदिवस वाढत जाऊन, आणि पुढें उभयपक्षीं अनेक कारणें उत्पन्न होऊन, शेवटीं, इ० स० १८१८ ह्या वर्षीं पेशव्यांचें सगळें राज्य नष्ट झालें, आणि तें इंग्लिशांच्या हातीं लागलें.

असो. इतिहास धुंडिला, तर अशीं आणखीही पुष्कळ उदाहरणें सांपडतील. ह्यावरून अगदीं उघड सिद्ध होतें कीं, आमच्या देशांतलीं **आमचीं राज्यें आपसांतल्या कलहानें गेलीं.**

आतां, ह्यांत दोष कोणाचा? कलह करणारांचा कीं मध्यें पडणारांचा? आह्मी ह्मणतों, कलह करणारांचा अधिक दोष आहे. तो असा. आमचे राजे आणि नबाब हे जर आपसांत कलह न करिते, आणि आपल्या राज्यांच्या भानगडींत इंग्लिशांस मुळींच न घेते, तर, त्यांस त्यांत हात घालतां आला नसता, आणि त्यांस लाभही झाला नसता. आणखी, "दोघांचें भांडण आणि तिसऱ्यास लाभ" ही ह्मण ह्मणजे आमच्या राजेरजवाड्यांस ठाऊक नव्हती असेंही नाहीं. परंतु, होणारापुढें उपाय नाहीं, ही गोष्ट खरी आहे. इंग्लिशांनीं ह्या देशामध्यें येऊन, नानाप्रकारचे उद्योग करून जसें हें राज्य मिळविलें आहे, तसे उद्योग करण्यास आणि

तसें राज्य मिळविण्यास आमच्या लोकांचे कोणी हात धरिले आहेत काय? हें सगळें उद्योगाचें फल आहे.

पहा. कलहाच्या योगानें जर राज्यांचीं राज्यें नाश पावलीं आहेत, तर, त्याच्या पुढें सामान्य संसारांचा पाड काय? तर, हार सोसावी, पण कलह करूं नये, हा उत्तम मार्ग होय. तो सर्वांनीं धरावा. त्यांत सुख आहे.

---

## चंद्र.



सूर्य हा ग्रहमालेचा मध्य आहे. त्याच्या भोंवतीं फिरणारे आठ गोल आहेत. त्यांचीं नांवें, मंगळ, बुध, गुरु, शुक्र, शनि, पृथ्वी, युरेनस आणि नेप्च्यून हीं आहेत. ह्या आठांस ग्रह असें ह्मणतात. आणि ह्या आठांपैकीं प्रत्येकांच्या भोंवतीं फिरणारे जे गोल आहेत, त्यांस उपग्रह ह्मणतात. आपली पृथ्वी हा एक ग्रह

आहे; आणि तिच्या सभोंवतीं चंद्र हा फिरत आहे; ह्मणून तो उपग्रह होय.

चंद्र हा स्वयंप्रकाश नाहीं. तर, तो चकचकीत दिसून प्रकाश देतो हें सगळें, त्यावर सूर्याचे किरण पडल्यामुळें होतें. पृथ्वी सूर्याभोंवतीं ३६५ दिवसांत एक प्रदक्षिणा करीत आहे, आणि चंद्र तिच्या सभोंवतीं सुमारें ३० दिवसांत प्रदक्षिणा करीत आहे; त्यामुळें, अगदीं नियमित रीतीनें ही पृथ्वी, सूर्य आणि चंद्र ह्यांच्या आड येते, आणि तेणेंकरून, क्रमाक्रमानें, चंद्राच्या कळा सुमारें पंधरा दिवसपर्यंत हळू हळू वाढत जाऊन पौर्णिमेस पूर्ण होतात, आणि पुढें पंधरा दिवसपर्यंत हळू हळू कमी कमी होत जाऊन अमावास्येस अगदीं नाहींतशा होतात. कळा वाढत जातात त्या पंधरवड्यास शुक्लपक्ष ह्मणतात, आणि कळा कमी होत जातात त्या पंधरवड्यास कृष्णपक्ष ह्मणतात. शुक्ल ह्याचा अर्थ पांढरा असा आहे, आणि कृष्ण ह्याचा अर्थ काळा असा आहे. हे दोन पंधरवडे मिळून सुमारें तीस दिवसांचा एक महिना होतो. आणखी, चंद्र हा फिरतां फिरतां कितीएक नक्षत्रांजवळून जातो; आणि तो पौर्णिमेच्या दिवशीं ज्या नक्षत्राच्या आसपास असतो, त्या नक्षत्राच्या नांवावरून त्या महिन्यास नांव पडलेलें आहे; ह्मणजे असें:—

| | |
|---|---|
| चित्रांवरून—चैत्र पडले आहे. | अश्विनीवरून-आश्विनपडलेंआहे. |
| विशाखा,,—वैशाख ,, | कृत्तिका ,,—कार्तिक ,, |
| ज्येष्ठा ,,—ज्येष्ठ ,, | मृगशीर्ष ,,—मार्गशीर्ष ,, |
| उत्तराषाढा—आषाढ ,, | पुष्य ,,—पौष ,, |
| श्रवण ,,—श्रावण ,, | मघा ,,—माघ ,, |
| उत्तराभाद्रपदा-भाद्रपद ,, | उत्तराफल्गुनी-फाल्गुन ;, |

चंद्र आणि पृथ्वी ह्यांच्यामध्यें अंतर २,३८,८०० मैल आहे. चंद्राचा व्यास, २१६० मैल आहे. चंद्र आकारानें पृथ्वीच्या एकुणपन्नासाव्या अंशा इतका लहान आहे. चंद्राचें पृष्ठफळ पृथ्वीच्या पृष्ठफळाच्या सोळाव्या हिशाएवढें आहे.

चंद्रावर पाणी नाहीं आणि हवा नाहीं. त्यामुळें तेथें जीवजंतु नाहींत, आणि झाडेंझुडें नाहींत. पूर्वीं चंद्रावर जीवंत ज्वालामुखी पर्वत होते, असें वाटतें. कां कीं, दुर्बिणींतून पाहिलें असतां त्यावर विझालेल्या ज्वालामुखी पर्वतांच्या तोंडांचीं मोठमोठीं भगदाडें दिसतात.

चंद्रोदय झाला ह्मणजे समुद्रास भरती येऊं लागते; चंद्र बरोबर माध्यान्हीस आला ह्मणजे भरतीची पूर्णता होते, तिला समा ह्मणतात; आणि चंद्र तेथून खालीं खालीं जाऊं लागला ह्मणजे ओहोट वळूं लागतो; त्याच्या पूर्णतेस निखार ह्मणतात. भरती केवळ समुद्रासच येते असें नव्हे; तर ती पृथ्वीवरच्या सर्व प्रवाही पदार्थांस येते. भरतीच्या वेळीं जर आंगास जखम झाली, तर तेव्हां इतर वेळांपेक्षां अधिक रक्त वाहतें.

---

## मागील अंकांतल्या प्रश्नाचें उत्तर.

| | |
|---|---|
| ती संख्या— | **नऊ.** |
| तो प्राणी— | **ऊ.** |
| बाकी— | **न.** |

ह्यास **मन** मागें लाविलें म्हणजे **मनन** होतें, आणि पुढें लाविलें म्हणजे **नमन** होतें. ह्यांतलें कोणतेंही घ्या; तें कार्यसिद्धीचें उत्तम साधन आहे.

---

# बालबोध.



## विष्णु परशुराम शास्त्री पंडित.



चांगल्या गोष्टी कोणत्या हें कळणें वेगळें, आणि चांगल्या गोष्टी करणें हें वेगळें. चांगल्या गोष्टी कोणत्या हें कळत नाहीं, असे लोक फार थोडे असतात; परंतु, दृढनिश्चयानें, चांगल्या गोष्टी करणारे असे फारच थोडे—किंबहुना हजारीं एक दोन किंवा लाखांत एक दोन—असतात, असें ह्मटलें तरी चालेल. आणि असे पुरुष राष्ट्रांस उन्नति प्राप्त होण्यास मुख्य कारणभूत होतात. ह्मणून, सर्व सुज्ञजन त्यांचें देव्हारें करितात, आणि त्यांची कीर्ति गातात. वेदशास्त्रसंपन्न राजमान्य राजश्री कैलासवासी **विष्णु परशुराम शास्त्री पंडित** हे गृहस्थ ह्या प्रकारचे होते. त्यांचें चारित्र आह्मी येथें सादर करितों.

पंडिताचें मूळ ठिकाण सातारा होय. तेथें, इ० स० १८२७ ह्या वर्षीं विष्णु शास्त्री ह्यांचें जन्म झालें. त्यांनीं लहानपणीं वे० शा० सं० रा० रा० राघवेंद्रा-

चार्य गजेंद्रगडकर ह्यांजपाशीं व्याकरणशास्त्राचा अभ्यास केला. पुढें आणखी अभ्यास करण्याकरितां आपल्या वयाच्या अठराव्या वर्षीं ते पुण्यास आले. नंतर थोडक्या दिवसांनीं इ० स० १८४८ त त्यांचे वडील निवर्तले. तेव्हां त्यांस संसाराचा भार आंगावर घ्यावा लागला. ह्या वेळेच्या सुमारास त्यांस इंग्लिश भाषा येत होती. त्यांनीं इ० स० १८५५ त, शाळाखात्यामध्यें भाषांतर करण्याची एक लहानशी जागा पतकरिली; नंतर तेथून धारवाडच्या इंग्लिश शाळेवर त्यांची बदली झाली. तेथें कांहीं दिवस काम केल्यावर त्यांस मालेगांवच्या इंग्रजी शाळेवर नेमिलें. त्या ठिकाणीं कांहीं दिवस चांगल्या प्रकारें काम केल्यावर, त्यांनीं स्वतंत्र धंदा करण्याचा विचार मनांत आणून, नौकरीचा राजीनामा दिला; आणि इ० स० १८६४त ते **इंदुप्रकाश** वर्तमानपत्र चालवूं लागले.

**इंदुप्रकाश** चालू केल्यावर ते लोकस्थितीविषयीं विचार करूं लागले. तींत त्यांस पुष्कळ गोष्टी उण्या दिसून आल्या. त्यांत, ब्राह्मणविधवा लग्न करीत नाहींत, हें व्यंग त्यांस फार मोठें वाटून, त्यानें त्यांचें चित्त वेधिलें. ह्मणून आधीं विधवाविवाह सशास्त्र आहे किंवा अशास्त्र आहे, हें पहायाच्या शोधास ते लागले. इतक्यांत, बंगाल्यामध्यें, ईश्वरचंद्र विद्यासागर ह्यांनीं त्याच विषयावर एक ग्रंथ छापून प्रसिद्ध केला. त्याचें पुष्कळ साह्य विष्णुशास्त्री यांस मिळालें असावें. आणखी शिवाय हिंदुधर्मशास्त्रांतले दुसरे पुष्कळ आधार काढून, ब्राह्मणविधवाविवाह सशास्त्र आहे, असें त्यांनीं सिद्ध करून प्रसिद्ध

केलें, आणि "**पुनर्विवाहोत्तेजक मंडळी**" स्थापिली. एवढ्यानें त्यांची तृप्ति झाली नाहीं. त्या वेळीं बहुतेक सर्व लोक जरी पुनर्विवाहाच्या विरुद्ध होते, तरी, आपण त्या पक्षाचे आहों, आणि जे कोणी विधवांशीं विवाह कारितील, त्यांच्या पंक्तीस बसण्यास आपण तयार आहों, असें त्यांनीं प्रसिद्ध केलें. ह्या कृत्यास त्यांस पाठबळ देण्यास, वे० शा० सं० रा० रा० कैलासवासी **श्रीकृष्णशास्त्री तळेकरांसारखी** कितीएक थोर विद्वान मंडळी अनुकूल होती. नंतर, उघडपणें लोकांत दोन पक्ष झाले. विधवाविवाहपक्षाच्या लोकांस दुसऱ्या पक्षाच्या लोकांनीं बहिष्कृत केलें; आणि त्यांचा पुष्कळ छळ केला; तो त्यांनीं मोठ्या धैर्यानें सोसिला; आणि आपला तो उद्योग मोठ्या आवेशानें चालविला. पुढें, विधवाविवाह सशास्त्र आहे कीं अशास्त्र आहे, ह्याचा निर्णय वादानें करण्याकरितां, इ० स० १८७० ह्या वर्षीं **श्रीशंकराचार्यस्वामी** अध्यक्षस्थानीं बसून, पुणें येथें एक मोठी सभा भरली. तींत पुष्कळ विद्वान लोक होते. तेथल्या वादाचा निर्णय संदिग्ध राहिला. तरी, पुनर्विवाह अशास्त्र ठरला नाहीं.

पुढें दुर्दैवेंकरून ह्मणा, किंवा शास्त्रीबावांचा निश्चय कसोटीस लावण्याकरितां ह्मणा, त्यांची बायको मरण पावली, आणि, ते बोलण्याप्रमाणें चालतात किंवा उगाच गप्पा मारतात, हें बाहेर पडण्याचा प्रसंग आला. त्या प्रसंगास त्यांनीं पूर्णपणें ओळखिलें. आणि, जरी लग्न करण्याचें त्यांचें वय नव्हतें, तरी, आपण बोलण्याप्रमाणें चालतों, असें जनांस स्पष्ट दाखविण्याकरितां, इ० स०

१८७४ त त्यांनीं स्वतः एका विधवेशीं लग्न लाविलें. तेंव्हां प्रतिपक्षाच्या लोकांनीं त्यांजवर शिव्याशापांची केवळ लाखोली वाहिली; आणि अनेक कचाटें त्यांवर उभीं केलीं. तरी ते तिळभरही डगले नाहींत. परंतु, ह्यानंतर शास्त्रीबावा फार दिवस जगले नाहींत. ते महाबळेश्वरास गेले होते. तेथें त्यांस एकाएकीं नवज्वर होऊन, इ० स० १८७६ च्या एप्रिल महिन्याच्या २९ व्या तारखेस देवाज्ञा झाली.

शास्त्रीबावा केवळ विधवाविवाहाच्याच कामांत पुढारी होते, असें नव्हे; तर, इतर देशहिताच्या कामींही ते फार झटत असत. त्यामुळें त्यांच्या मरणानें आमच्या ह्या राष्ट्राची जी फार मोठी हानि झाली आहे, ती कधीं भरून यावयाची नाहीं. त्यांस संस्कृत, इंग्लिश आणि मराठी ह्या भाषा उत्तम प्रकारें येत असून, ते कवि होते. त्यांचे अनेक ग्रंथ प्रसिद्ध आणि लोकमान्य आहेत. शास्त्रीबावांच्या ठायीं जे अनेक सद्गुण होते, त्यांत "**बोले तैसा चाले**" हा सद्गुण अत्यंत वंदनीय होता. ह्मणूनच "**त्याचीं वंदावीं पाउलें,**" असें आह्मांस वाटतें.

---

आमच्या देशाचे हितकर्ते श्रीमान **लार्डरिपन** हे ह्या महिन्यांत आपलें काम सोडून स्वदेशीं जाणार. त्यांस मान देण्याची तयारी जिकडे तिकडे चालली आहे. त्यांचें स्तुतिस्तोत्र करण्याचा उत्तम प्रसंग हा आहे. म्हणून, आम्ही आपल्या वतीनें व आमच्या तीन सहस्र प्रिय वाचणाऱ्यांच्या वतीनें, अत्यंत प्रेमपूर्वक, त्यांस बहुत बहुत **सलाम** करितों.—तो हा:—

# लार्ड रिपन साहेबांस सलाम.



## श्लोक.

परजनव्यसनास हरावया
उपजवी प्रभु साधु जगांत या
बुध तयांतिल एक तुह्मी अहां
रिपन भाग्य अहो तुमचें महा. १.
जरि खरे परके तरि आमुचें
हित तुह्मांस करूं सगळें रुचे
स्वपर हें न तुह्मां शिवलें अहा
रिपन सज्जनता तुमची महा. २.
नयपथीं जन गौर अगौरही
समसमान रिघोत सदा महीं

झणुनियां त्यजिली स्वजनस्पृहा
**रिपन** हो तुमची धृति हे महा. ३.
निजकलाकुशलत्वगतांस या
बघुनियां तुमच्या हृदया दया
उपजली बहु साह्य दिलें किती
**रिपन** धन्य अहो तुमची मती. ४.

अहा आह्मां द्याया सुख भरतखंडांतिल जनां
तुह्मीं यत्नां केलें शिणवुनि अमोघा तनमना
खलांच्या वाग्बाणां न गणुनि धरोनी नयपथा
स्वकर्तव्या केलें मधुर तुमची हे बहु कथा. ५.
अहो साधो आह्मां उपकृतिसमुद्रीं बुडविलें
कसें फेडावें हें ऋण बिकट यां गूढ पडलें
निघालां जायाला निजजनपदीं आजि सहसा
नसे बोलायाला अवसर विडा घ्या क्षण बसा. ६.
प्रणामानें होती जन सकल उत्तीर्ण हरिचे
**सलामानें** होतों नतशिर तसे आज तुमचे
असोंद्या दीनांचें स्मरण निजचित्तीं नरमणी
प्रसादा या मागों कर जुळुनि लागोनि चरणीं. ७.

## परमेश्वर प्रार्थना.

### श्लोक.

कुटुंबसुखसंपत्ती यशकीर्ति शतांवरी
द्यावी त्वां **रिपनां** देवा भक्तकामसुरद्रुमा. ८

---

## वातावरण.

हा शब्द अमळसा कठिण आहे. हा, दोन शब्द मिळून झालेला आहे:— वात आणि आवरण. वात ह्म-

णजे वारा, आणि आवरण ह्मणजे वेष्टण—झांकण. ह्मणजे, वातावरण ह्याचा अर्थ, वाऱ्याचें बनलेलें वेष्टण. हें वेष्टण आपल्या ह्या पृथ्वीभोंवतीं आहे. वारा हा पदार्थ असा आहे कीं, तो आहे खरा, असें स्पर्शानें मात्र मनुष्यास कळतें दुसऱ्या कोणत्यही इंद्रियानें कळत नाहीं. तो जरी दिसत नाहीं, तरी तो आहे, ह्याविषयीं कोणास शंका नाहीं; एकाद्या चेंडूस डिंकाचा हात लावून त्यावर बारीक पिंजलेला कापूस बोट दोन बोटें हळूच चिकटवावा, तसें हें वेष्टण ह्या पृथ्वीच्या भोंवतीं आहे. तो कापूस जसा त्या चेंडूच्या अगदीं आंगाशीं दाट असून वर वर विरळ विरळ होत जातो, तसें हें वातावरण पृथ्वीच्या आंगाशीं दाट असून वर पातळ पातळ होत गेलें आहे. ह्या वातावरणासच हवा ह्मणतात.

वातावरण हा खरोखर पदार्थ आहे, तेव्हां त्याला वजन असलें पाहिजे. विद्वान लोकांनीं प्रयोग करून पाहून असें सिद्ध केलें आहे कीं, वातावरणाच्या ८०० मापांचें वजन पाण्याच्या एका मापाच्या वजनाइतकें आहे. पृथ्वीच्या पृष्ठभागापासून वर सुमारें ४९ मैलपर्यंत वातावरण पसरलें आहे. समुद्राच्या पृष्ठभागावरील एक इंच लांब आणि एक इंच रुंद एवढ्या जागेवरच्या वातावरणाच्या खांबाचें वजन सुमारें साडेसात शेर भरतें. ह्या मानानें पाहिलें असतां, आपल्या शरीरावर वातावरणाचें वजन किती असावें तें पहा. तें तितकें आहे, तरी, त्याच्या भारानें आपला चुराडा होत नाहीं. कां कीं, ह्या वरच्या भारास तोलून धरण्यास आपल्या शरीरामध्यें वातावरण आहे. वातावरण आंत नसतें, तर आपलें

कसें झालें असतें, हें पहायाचें असल्यास, एखाद्या चंबूंतून यंत्राच्या साह्यानें सगळें वातावरण काढून टाकून, त्याच्या तोंडावर हात ठेवावा, ह्मणजे, वरच्या वातावरणाचा भार हातास कसा जाणवतो, तें तेव्हांच लक्षांत येईल.

अनेक प्रवाही पदार्थ एकत्र केले ह्मणजे, जड असतात ते खालीं राहतात, आणि हलके असतात ते वर येतात, ही गोष्ट तेलपाण्याच्या मिश्रणावरून सर्वांस समजण्यासारखी आहे. तीच गोष्ट वायुरूपी पदार्थांस लागू आहे. आणि तिच्याच आधारानें आलीकडे विमानें करूं लागले आहेत. विमान ह्मणजे काय? विमान ह्मणजे, फार बारीक तापत्याची, वारा देखील बाहेर न जाई, अशी पेटी. तींत उष्ण हवा भरतात, ती भोंवताल्च्या थंड हवेपेक्षां हलकी असते; ह्मणून ती, पाण्यातल्या तेलाप्रमाणें जोरानें वर जाते. असा विमानाचा प्रयोग प्रथम, इ० स० १७८३ ह्या वर्षीं दोघां फ्रेंच माणसांनीं करून पाहिला. अशा विमानांतून सुमारें दोन कोसपर्यंत वर जातां येऊं लागलें आहे. तितकें वर गेलें ह्मणजे तेथें थंडी इतकी लागते कीं, पाणी लागलेंच थिजून जातें. आणि मनुष्याच्या नाकांतल्या वगैरे नाजूक शिरा फुटून त्यांतून रक्त वाहूं लागतें. कां कीं, वरची हवा पातळ असल्यामुळें तिचें वजन खालच्या दाट हवेच्या वजनाइतकें नसतें. तेव्हां अर्थात् त्या शिरांतली हवा शिरा फोडून बाहेर येते. तीबरोबर रक्त येतें.

विमानांत बसून वर जाण्याचें साधलें आहे; परंतु, अमुक नियमित ठिकाणीं उतरतां यावें, हें अद्याप साधलें नाहीं. तें अद्याप वाऱ्याच्या स्वाधीन आहे. तेवढें



जेव्हां मनुष्यास साधेल, तेव्हां, प्रवासादिकांच्या कामांत आगगाड्यांस कोणी विचारणार नाहीं. वर जें चित्र काढिलें आहे, तें विमानाचें आहे.

आमचीं प्राचीन पुराणें पाहूं लागलों ह्मणजे त्यांत आपणांस असें आढळतें कीं, लोक तेव्हां, विमानांत बसून प्रवास करीत असत. ह्यावरून, जी कला सध्या माहीत नाहीं, ती तेव्हां माहीत होती, असें उघड होतें. ह्मणजे, आमचें हें राष्ट्र पूर्वीं, इंग्लंड किंवा फ्रान्स हल्लीं आहे, त्यापेक्षां फार विद्याचारसंपन्न होतें, असें सर्वांस कबूल करणें भाग आहे. आणखी, जगामध्यें सर्व गोष्टींची जर पुनरावृत्ति होत आहे, तर ह्याही गोष्टीची पुनरावृत्ति कां न व्हावी ? व्हावी. अवश्य होईल; मग लवकर ह्मणा कीं उशीरानें ह्मणा.

---

## न्याय करण्याविषयीं दृढ निश्चय.

न्याय ह्मटला ह्मणजे मग तेथें लोभ, माया, ममता, इत्यादि मनोभावनांचें कांहीं एक चालूं नये; आणि जें

योग्य असेल तेंच व्हावें. परंतु, हें फार कठिण आहे. हें पूर्णपणें साधण्यास मोठाच निग्रह पाहिजे. तो क्वचित् आढळतो; आणि तो आढळला ह्मणजे विलक्षण आश्चर्य वाटल्यावांचून राहात नाहीं.

ऐर्लंड देशामध्यें गालवे ह्मणून एक शहर आहे. तेथें जेम्स लिंच फिटस्टीफन ह्या नांवाचा कोणी एक मोठा व्यापारी राहात असे. त्यानें कोणे एके वेळीं, आपला मुलगा फिटस्टीफन ह्यास, बरोबर पैशाची चांगली मोठी रकम देऊन, गलबतांत बसवून, दारू खरेदी करून आणण्यास, स्पेन देशामध्यें बिलबोआ ह्या गांवीं पाठविलें; आणि त्या कामांत त्याला साह्य करण्याविषयीं त्यानें त्याबरोबर आपल्या तेथल्या अडत्यास पत्रही दिलें. तो मुलगा बिलबोआ येथें पोंचला; त्यानें तें आणिलेलें पत्र अडत्यास दिलें; आणि बरोबर आणलेली रकम तशीच मधच्यामध्यें आपले जवळ ठेवून, त्या अडत्यापासून पांचचार हजार रुपयांची दारू उधार घेऊन, परत स्वदेशीं येण्याची तयारी केली. तेव्हां, त्या अडत्यानें आपला मुलगा त्याच्या बरोबर दिला; तो एवढ्याच करितां कीं, त्यानें त्या दारूबद्दलची रकम त्या व्यापाऱ्यापासून मागून आणावी, आणि उभयपक्षीं परिचय दृढ व्हावा. त्याप्रमाणें ते दोघे जण जहाजांत बसून ऐर्लंडाकडे यावयास निघाले. प्रथम कांहीं दिवसपर्यंत त्या दोघांचें प्रेम परस्परांवर फार जडलेंसें दिसलें. परंतु, ऐर्लंड जवळ जवळ येत चाललें तसतसें त्या व्यापाऱ्याच्या मुलास असें भय वाटूं लागलें कीं, हा अडत्याचा मुलगा जर माझ्या बापाला जाऊन भेटला, तर,

मी जो पैसा मधच्या मध्येंच ठेविला आहे, तो त्यास कळेल, आणि तेणेंकरून माझी फार फजीती होईल. तें भय टाळण्याकारितां, त्या व्यापाऱ्याच्या मुलानें, गलबतावरच्या खलाशांच्या साह्यानें, अडत्याच्या मुलास एके रात्रीं समुद्रांत टाकून दिलें.

नंतर फिटस्टीफन हा सुरक्षितपणें आपल्या घरीं पोचला. त्यानें मोठें काम केलें असें वाटून त्याच्या बापास फार संतोष झाला. त्या दारूच्या व्यापारांत त्याला चांगला फायदा झाला. आणि तो मुलगा वेगळा व्यापारी बनून, त्याच्या लग्नाचाही विचार ठरला. तिथिनिश्चय झाला. सगळी तयारी झाली. इतक्यांत, त्या गलबतावरच्या एका खलाशाचें पत्र त्या व्यापाऱ्यास येऊन पोंचलें. त्यांत, त्याच्या मुलानें अडत्याच्या मुलास कसें ठार मारिलें, ह्याची सगळी हकीकत लिहिली होती. तें पत्र वाचून त्याच्या मनाला मोठा धक्का बसला, आणि त्याला अत्यंत दुःख झालें. तो कांहीं वेळ अगदीं स्तब्ध राहून, मोठ्या गंभीर मुद्रेनें ह्मणाला, "न्याय झाला पाहिजे; आणि तो खचीत होईल." आणि त्यानें आपल्या मुलाला लागलेंच सरकारच्या शिपायांच्या हवालीं केलें.

जेम्स लिंच फिटस्टीफन हा केवळ व्यापारीच नव्हता; तर त्या शहरचें न्यायाधीशाचेंही काम त्याजकडेसच होतें. तेव्हां, त्यास आपल्या मुलावरच्या आरोपाची चौकशी करणें भाग पडलें. त्या चौकशींत त्याजवर तो अपराध केल्याची शाबिदी झाली; आणि, त्या धैर्याच्या पुरुषानें, घरच्या माणसांच्या अश्रुधारांकडे लक्ष न देतां, आणि पुत्रप्रेमाच्या पाशास न जुमानितां, केवळ न्या-

यावर दृष्टि ठेवून, आपल्या पोटच्या पुत्रास मृत्यूची शिक्षा दिली! तीप्रमाणें त्यास फांशीं देण्याचा समय प्राप्त होण्याच्या आधीं एक घटका, तो पिता आपल्या पुत्राकडे गेला; आणि, मोठ्या प्रेमानें त्यास पोटाशीं धरून त्यानें त्याचा निरोप घेतला. नंतर थोडक्या वेळानें त्या मुलास सरकारच्या लोकांनीं फांशीं दिलें.

त्या बापाच्या अंतःकरणांत पुत्रप्रेम आणि न्यायनिष्ठा ह्यांचा फार मोठा झगडा झाला, आणि त्यांत शेवटीं न्यायनिष्ठेचा जय झाला, ही गोष्ट किती चमत्कारिक आहे! अशा गोष्टी इतिहासांत फारच थोड्या सांपडतील; परंतु संसाराच्या भट्टीमध्यें, आत्महितासारखें हीण टाकून देऊन, न्यायीपणासारखें बावनकशी सोनें घेऊन जे बाहेर पडतात, तेच कसास खरे उतरले समजावयाचे. असे पुरुष धन्य होत.

---

## याचकच जर नाहीं, तर दाता कशाला?

सवाईमाधवराव पेशव्यांचा एक वकील एके वेळीं निजामअल्लीकडे गेला होता. त्यास निजामअल्लीनें विचारिलें कीं, "आमची स्वारी बाहेर निघाली ह्मणजे, हत्तीच्या अंबारींतून आह्मी जसे पैसे गरीबांकरितां उधळितों, तसे, पेशवे बाहेर पडतात तेव्हां उधळितात कीं नाहीं?" वकीलानें उत्तर केलें, "सरकार, श्रीमंत असे पैसे उधळीत नाहींत. कां कीं, ते वेंचण्यास त्यांच्या राजधानींत एक देखील मनुष्य नाहीं!" तें ऐकून निजामअल्ली चूप राहिला. शहाण्याची बलाय दूर.

---

# बालबोध.



## लार्ड डफरिन.



गेल्या महिन्याच्या तेराव्या तारखेस हिंदुस्थानाच्या गव्हरनर जनरलाचें काम लार्ड रिपन ह्यांनीं सोडिलें, आणि तें काम लार्ड डफरिन हे पाहूं लागले आहेत. लार्ड रिपन ह्यांचें चरित्र आह्मीं कांहीं दिवसांमागें सादर केलें आहे. आतां, लार्ड डफरिन ह्यांच्या चरित्रांतल्या कांहीं मुख्य गोष्टी येथें सांगतों.

लार्ड डफरिन हे इटाली देशांत फ्लारेन्स येथें इ० स० १८२६ च्या जून महिन्यांत जन्मले. त्यांचा बराच विद्याभ्यास इटननामक प्रख्यात शाळेंत झाला; नंतर ते आक्सफोर्डच्या पाठशाळेंत जाऊं लागले. ते-

थेंही त्यांनीं फार चांगला अभ्यास केला. त्यापुढें लवकरच ते सरकारी कामांत शिरले.

इ० स० १८५९ त लार्ड जान रसेल हे कांहीं मुत्सद्दीपणाच्या कामानिमित्त व्हायना येथें आले होते; त्यांच्याबरोबर ह्यांस दिलें होतें. पुढें तुर्क सरकारानें ख्रिस्ती लोकांचा छळ केल्याबद्दलच्या चौकशीकरितां, त्यांस महाराणी साहेबांचे मुख्य प्रधान लार्ड पामर्स्टन ह्यांनीं, इ० स० १८६० त, सीरिया प्रांतांत पाठविलें. तें काम फार नाजूक होतें; तरी, तें त्यांनीं मोठ्या चतुराईनें उत्तम प्रकारें बजाविलें. तेणेंकरून विलायतच्या दरबारांत त्यांची मोठी वाहवा झाली; आणि त्यांस सरकारांतून के. सी. बी. हा किताब मिळाला. इ० स० १८६४ पासून इ० स० १८६६त ते, हिंदुस्थानसंबंधाचे महाराणी सरकारचे अंडर सेक्रेटरी होते. त्यांस त्या शेवटच्या वर्षीं मुंबईच्या गव्हरनराची जागा सरकार देत होतें; पण त्यांनीं ती नको ह्मटली. इ० स० १८७२ पासून इ० स० १८७८ पर्यंत ते, उत्तर अमेरिकेंतल्या कानडा देशाचे गव्हरनर जनरल होते. तेथें त्यांनीं आपलें काम फार उत्तम रीतीनें केलें; त्यानंतर, त्यांस, सरकारानें, प्रथम सेंटपीटर्सबर्ग येथें, आणि मग कानस्थ्यांटिनोपल येथें, इंग्लिश सरकारचे वकील ह्मणून पाठविलें. तदनंतर ते ईजिप्तमध्यें कैरो येथें इंग्लिश सरकारच्या वतीनें मुख्य होऊन गेले. तिकडेही त्यांनीं आपलीं कामें उत्तम रीतीनें बजाविलीं.

अशी त्यांची कर्तबगारी दिसून आल्यावरून, महाराणी सरकारानें त्यांस हिंदुस्थानावर मुख्य अधिकारी

नेमिलें आहे. ते लार्ड रिपन साहेबांप्रमाणेंच मोठे न्यायी, मोठे निश्चयी आणि परमेश्वरास भिऊन आपलें कर्तव्य करण्याविषयीं परम दक्ष असे आहेत. आणि मुंबईस उतरल्याबरोबर त्यांनीं जें भाषण केलें, त्यांत असें स्पष्ट ह्मटलें कीं, " भीतीनें, भिडेनें किंवा आपल्या सुखाच्या आशेनें, मी आपलें अमुक कर्तव्य करण्यास मागें सरलों, असें कधीं कोणास ह्मणूं देणार नाहीं; आणि हिंदुस्थानाच्या कल्याणाचा प्रसंग आला असतां, मी तो कधींही फुकट जाऊं देणार नाहीं."

आमच्या ह्या राष्ट्राच्या राज्यकारभारांत कोणकोणत्या गोष्टींकडे लार्ड डफरिन ह्यांनीं विशेष लक्ष पुरविलें पाहिजे, त्यांतल्या मुख्य आह्मी येथें सांगतों.

१. मिठावरची जकात कमी केली पाहिजे.

२. जंगलाच्या रक्षणाच्या संबंधाचे कायदे फार कडक आहेत, ते सुधारले पाहिजेत.

३. प्राप्तीवरचा कर लोकांस फार त्रासदायक वाटतो, तो बंद केला पाहिजे.

४. न्याय करण्याच्या संबंधानें गोरे लोक आणि काळे लोक ह्यांविषयीं जो पक्षपात कायद्यांत आहे, तो काढून टाकिला पाहिजे.

५. शेतकऱ्यांस आपली स्थिति सुधारण्यास सामर्थ्य यावें, आणि त्यांस लबाड सावकारांनीं ठकवूं नये, अशा तजविजी केल्या पाहिजेत.

६. सरकारी कामामध्यें एतद्देशीय लोकांस मोठाल्या जागा देऊन, आणि त्यांची मानप्रतिष्ठा वाढवून, सर्व राष्ट्राचा विश्वास संपादिला पाहिजे.

७. लोकांजवळ शस्त्रें नसल्यामुळें, कितीएक माणसें वाघलांडग्यांच्या तावडीस सांपडून प्राणास मुकतात. ह्यास्तव, सर्वांस हत्यारें बाळगण्याची सदर परवानगी दिली पाहिजे; कांहींएक शंका घेण्याचें प्रयोजन नाहीं.

८. आह्मां लोकांस नुसतें शब्दज्ञान करून देण्याचा जो प्रघात चालला आहे, तो बंद करून, वस्तुज्ञान करून देण्याचा प्रघात चालविला पाहिजे. ह्मणजे, अमुक काम असें करावें, असें आह्मांस कळून उपयोगीं नाहीं; तर, तें प्रत्यक्ष करितां आलें पाहिजे.

एवढीं कामें ह्या गृहस्थांनीं केलीं, ह्मणजे, हे, आपल्या मनदेवतेच्या, आपल्या राजाच्या, आपल्या लोकांच्या, आणि परमेश्वराच्या शब्दांतून मुक्त झाले, असें होईल. आणखी दुसरें त्यांनीं काय इच्छावें? हीं सगळीं कामें यथास्थितपणें करण्यास त्यांस परमेश्वर बुद्धि आणि साह्य देवो.

आह्मी त्यांस ह्मणतों:—

### श्लोक.

डरूं नका दुष्ट जनापवादा
फसूं नका व्यर्थ भुलोनि नादा
रितें नयें तें न कधीं करा हो
नतीं जनीं प्रेम अखंड राहो. १.

---

## विश्वरचना.

### श्लोक.

येवोनी उदयास सूर्य सकळा देतो प्रभा उष्णता
नाना गंध फुलें फळें वितरिती झाडें तशा या लता
वेळीं भूवरतीं सुनिर्मलजला मेघावली वर्षती
तेणें जीव वनस्पती सुख सदा पावोनियां हर्षती. १.

मोठाल्या गिरिगव्हरांतुनि कशा घो घो नद्या वाहती
मार्गस्थां श्रमलेलियां जल पिऊं देओनियां तर्पिती
देती औषधि हीं वनें कठिण या रोगांस नाशावया
तैसा आश्रय स्थान थोर पशुपक्षी यांस राहावया. २.
गाई दूध मुलांस अर्पिति तसें थोरांस पीवावया
तेणें तुष्टि तशीच पुष्टि विपुला येते समस्तां तयां
देतो सागर मोलवान विविधें मोत्यें जनांतें किती
नौका वाहुनि साह्य फार करितो नाहीं तयातें मिती. ३.
पक्षी मंजुळ गान ऐकवुनियां संतोषवीती जना
देताती मधुमक्षिका मधु कळे त्यांची कुणा कल्पना
कस्तूरीमृग अर्पितो अनुपमा कस्तूरिका ही पहा
विश्वाची रचना बघोनि असली आश्चर्य वाटे महा. ४.
विश्वाच्या रचनेसमान विषयो नाहींच मोठा दुजा
वाटे अन्य कितीहि विस्तृत तरी त्याच्यापुढें तो खुजा
शांति श्रीहरिभक्ति आत्मलघुता ऐशा मनोभावना
हा उत्पन्न करोनियां स्थिरवितो त्रस्ता जनाच्या मना. ५.
देवानें तुझिया सुखार्थ रचिली ही सृष्टि गा मानवा
बुद्ध्या काढुनियां कुतर्क धरिसी कां बा मनीं वानवा
शास्त्रें पाहुनियां प्रबुद्धवचनें आणोनियां अंतरीं
सारासार विचार तूं निजहिता साधावयाला करीं. ६.

---

## चुकणें.

चुकणें ह्मणजे जें करूं नये तें करणें; तें प्रत्येक माणसाच्या मागें लागलें आहे. हातून चूक झाली नाहीं, असा मनुष्य आजपर्यंत ह्या जगांत झाला नाहीं; आणि हातून चूक होणार नाहीं, असा मनुष्य ह्यापुढें कधीं व्हावयाचा नाहीं. आणखी दुसरें असें आहे कीं, चूक लहान असो अगर मोठी असो, तिच्या योगानें हानि

झाल्यावांचून राहात नाहीं. परंतु, त्यांतही पर्याय आहेत. ते असे कीं, ज्या माणसाच्या हातून चुकी होते, त्या माणसाचा अधिकार ज्या मानानें लहान किंवा मोठा असतो, त्या मानानें ती हानि लहान किंवा मोठी होते. आणि लहान हानि आणि मोठी हानि ह्यांमध्यें अंतर एवढेंच कीं, ज्या हानीपासून अल्प पीडा होते, किंवा थोड्यांस दुःख होतें, ती लहान हानि, आणि ज्या हानीपासून अतिशयित पीडा होते, किंवा पुष्कळांस दुःख होतें, ती मोठी हानि होय. हें स्पष्ट कळण्यास कांहीं उदाहरणें दिलीं पाहिजेत.

स्वैंपाक्यानें चुकून भाकर वेळीं न उलथली, तर ती चूक खरी; पण तिचा परिणाम एवढाच कीं, ती भाकर करपावयाची; आणि त्यापासून हानि एवढीच कीं, ती करपलेली कडू भाकर कोणा तरी गरीब माणसाला खायाला लागावयाची. त्यांत फारसें कांहीं नाहीं. इंग्लंडचा पराक्रमी राजा आल्फ्रेड धि ग्रेट अज्ञातवासांत असतां, एका धनगराच्या येथें स्वैंपाक करतांना, त्याच्या हातून एक भाकर करपली. त्याबद्दल त्याला यजमाननीचें बोलणें सोसावें लागलें; किंवा फार तर ती भाकर त्याला खावी लागली असेल; ह्याच्यापलीकडे कांहीं झालें नाहीं. परंतु, ह्यांत एक लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, ही जी चूक त्याच्या हातून झाली, ती, तो, आचाऱ्याचें काम करीत असतां झाली, राजाचें काम करीत असतां झाली नाहीं; ह्मणून तिचा परिणाम फारसा झाला नाहीं.

आपल्या देशांतला मोंगल बादशहा शहाजहान, ह्याचे हातून दोन मोठ्या चुक्या झाल्या. त्यांतली प-

हिली चूक ही कीं, त्यानें आपल्या मुलांस मनःपूत वागूं देऊन, त्यांचे हातीं मोठमोठे अधिकार दिले. तेणेंकरून ते बेफाम झाले; आणि त्यांनीं पुष्कळ अनन्वित कर्मं केलीं. त्यांच्या योगानें त्यास कारागृहवास आणि अतिशयित अपमान सोसावा लागला. ह्या गोष्टी प्रसिद्ध आहेत; ह्मणून त्यांचें विवेचन येथें करण्याचें प्रयोजन नाहीं. ही जी चूक झाली, ती त्याचे हातून बापाच्या नात्यानें झाली; ह्मणून, तिजपासून उत्पन्न झालेला ताप, केवळ त्याला स्वतःला भोगावा लागला; त्याचा शिंतोडा राष्ट्रावर फारसा उडाला नाहीं.

ह्या बादशहाची दुसरी मोठी चूक ही कीं, बौटन-नामक इंग्लिश वैद्यानें त्याच्या मुलीस औषध देऊन बरें केल्याबद्दल, पुरता विचार न करितां, देशांतल्या एकंदर सगळ्या इंग्लिश व्यापाऱ्यांस त्यानें मोठमोठे हक्क दिले; ते इतके कीं, त्यांच्या योगानें त्यांस कांहींशी स्वतंत्रता प्राप्त झाली. ती पुढें हळू हळू वाढत जाऊन, तिचीच राजसत्ता झाली. ही चूक त्याचे हातून राजाच्या नात्यानें झाली; ह्मणून, तिचे परिणाम स्वतः त्याला फारसे बाधक झाले नाहींत; तर ते, सगळ्या राष्ट्राच्या हानीस कारणभूत झाले.

सुराजउद्दवल्याच्या चुकीनें बंगाल्याच्या नबाबाच्या गादीचा नाश झाला; वजीरअल्लीच्या चुकीनें अयोध्येच्या नबाबाच्या गादीचा नाश झाला; दुसऱ्या बाजीराव पेशव्याच्या चुकीनें पेशवाई रसातळास गेली; आणि शहाजी महाराजांच्या चुकीनें साताराची गादी नाहींशी झाली. राजांच्या चुक्यांनीं जशीं हीं राज्यें लयास गेलीं,

तशीं, कुटुंबांतल्या मुख्य माणसांच्या चुक्यांनीं, आजपर्यंत लहानमोठे किती संसार धुळीस मिळाले असतील, आणि किती अनर्थ झाले असतील, ह्यांची गणना देखील करितां यावयाची नाहीं. म्हणून, मनुष्यानें आपलीं कामेंकाजें करितांना, आपलीं सर्व प्रकारचीं नातीं संभाळिलीं पाहिजेत; ह्मणजे, त्यांत चूक न होऊं देण्याविषयीं फार जपलें पाहिजे. त्याप्रमाणें जे कोणी जपत नाहींत, त्यांपासून जनामध्यें नाश होतो. आणि आपल्या जिण्यापासून इतरांस त्रास होणें, हें कांहीं जन्मसार्थक्य नव्हे; तर, आपल्या जिण्यापासून कोणालाही झालें तर सुख व्हावें, हें जिण्याचें सार्थक्य आहे. ह्मणून, हातून चुकी न होण्याविषयीं जपणें हें शहाण्या मनुष्याचें अत्यंत अवश्य कर्तव्य कर्म होय.

---

## आकस्मिक दुखण्यांस उपाय.

दुःखाचें निवारण करणें आणि सुखाची वृद्धि करणें हा सगळ्या विद्येचा मुख्य हेतु होय. विद्येच्या संबंधाचीं जितकीं पुस्तकें आजपर्यंत लिहिलीं आहेत, त्यांत, प्रत्यक्ष ह्मणा, किंवा परंपरया ह्मणा, हा हेतु दृष्टीस पडतो. परंतु, कितीएक प्रसंग असे येतात कीं, त्या वेळीं पुस्तक पाहून विचार करण्यास, किंवा एकाद्या ज्ञात्याकडून उपाय योजविण्यास सवड नसते. तेव्हां, अशा आकस्मिक दुखण्यावर, ह्मणजे, अपघातावर, अल्पस्वल्प तरी उपाय माहीत असणें, हें अत्यंत आवश्यक आहे. कांकीं, असे प्रसंग कोणावर केव्हां येतील, ह्याचा कांहीं नेम सांगवत नाहीं. ह्मणून, ह्याविषयीं थोड्याशा गोष्टी आज येथें सांगतों.

आधणाच्या पाण्यानें किंवा विस्तवानें जर **आंग-भाजलें**, तर, कापूस बारीक विंचरून त्यावर चिकटवून द्यावा. विंचरलेला कापूस जवळ नसला, तर त्यावर तेल लावावें, किंवा मध लावावा. आणि मग पाहिजे असल्यास वारा घालावा. गार वाटण्याकरितां थंड पाणी कधींही ओतूं नये, कीं त्यावरचे फोड आपण होऊन फोडूं नयेत.

विळीनें, चाकूनें किंवा सुरीनें काम करीत असतां, जर एकादी **जखम झाली**, तर रक्तस्राव बंद होण्याकरितां, तो अवयव, त्या जखमेपासून दोनचार बोटें वर, बारीक दोरीनें गच्च आंवळून बांधावा. आणि, त्या जखमेमध्यें जर कांहीं केरकचरा गेला असला, तर, तीवर हळूच सोमाळ्या पाण्याची बारीक धार धरून, तो काढून टाकावा; आणि मग ती जखम तशीच पट्टीनें आंवळून बांधावी; आणि आंत फार दुखत असेल तर, तिजवर थोडथोडें थंड पाणी सोडीत जावें; त्यानें बरेंसें न वाटलें, तर, ऊन पाणी सोडावें, ह्मणजे बरें वाटेल, आणि जखम भरून येईल.

कधीं कधीं एकाएकीं **लचक** किंवा **उसण** भरून ती माणसाला अगदीं इकडचें तिकडे वळूं देत नाहीं. हें दुखणें जें आहे तें, हाडांच्या सांध्यांतल्या शिरा ढळल्यानें किंवा तुटल्यानें होतें. त्यास, कांहीं वेळपर्यंत अगदीं न हालतां जशाचें तसेंच बसून किंवा पडून रहावें; आणि आंगावर थंड पाणी पुष्कळ घेणें, हा त्यास उत्तम उपाय आहे. त्यानें जर दुःख कमी न होईल, तर, ऊन पाणी घ्यावें, ह्मणजे त्यानें बरें वाटेल.

एकाद्या ठिकाणावरून पडून हातापायांतलें **हाड मो-**

डणें, हें लागलेंच त्या अवयवाच्या आकारांत फेरफार झाल्यानें आणि ते हाडांचे तुकडे एकमेकांस लागून खुटखुट वाजल्यानें समजतें. ह्या दुखण्यांत आधीं पाहिलें काम हें कीं, तीं हाडें जशीं प्रथम होतीं, तशीं जुळून ठेवून, रोग्यास अगदीं हालचाल करूं देऊं नये; आणि मग लागलेंच वद्यास बोलावून आणावें. कांकीं हें दुखणें साधारण माणसांच्या हातून साधारण उपायांनीं बरें होण्यासारखें नाहीं.

कधीं कधीं पाणी काढतांना मनुष्यें **विहिरींत पडतात** आणि बुडतात. त्यांस आधीं जलदी करून बाहेर काढावें; आणि त्यांनीं पाणी प्यालें असल्यास, तें काढून टाकण्याकरितां, त्यांस घिरटावर वगैरे घालून चक्रें द्यावीं. आणि त्यांचें आंग चांगलें पुसून त्यावर गरम कपडे घालावे; आणि ऊन केलेल्या वाळूच्या कुप्यांनीं त्यांचें आंग शेकावें. घशांत मऊ नळी घालून तींतून हवा फुप्पुसांत घालावी, आणि पुनः हळूच ऊर दाबून ती बाहेर काढावी. असें चांगलें पांचचार घटिका चालवावें, ह्मणजे मनुष्य शुद्धीवर येऊन बरा होईल. पाण्यांतून बाहेर काढल्यावर मनुष्य कधीं कधीं मेल्यासारखें दिसतें; पण तें मेलेलें नसतें; त्यांत जीव असतो; त्यास हे उपाय केले, ह्मणजे तें सावध होतें.

**विष** पोटांत गेल्यानें मनुष्यास मरायाची पाळी येते. त्या प्रसंगीं ओकारी होण्यास औषध देऊन तें विष पोटांतून बाहेर काढिलें पाहिजे. तें ओकारीचें औषध मीठ घातलेलें पाणी होय. त्याप्रमाणेंच, घशांत बोटें किंवा पक्ष्याचा पर घालून ओकारी होईल असें करावें. तें, तें सगळें विष बाहेर पडेपर्यंत चालवावें.

पित्ताच्या योगानें किंवा उन्हांत फार वेळ राहिल्यानें जर घेरी आली, आणि मनुष्य **बेशुद्ध** झालें, तर, लागलेंच त्याच्या तोंडावर आणि डोक्यावर थंड पाणी शिपडावें, आणि हळूच वारा घालावा.

आपणांस एकाएकीं आपला हातपाय जर **बेशुद्ध** आणि **लुला** पडल्यासारखा वाटला, तर, तो लागलाच दुसऱ्या हातानें आणि पायानें खूब चोळावा, आणि गरम पांघरुणांत घ्यावा; अवकाश करूं नये.

एकाएकीं ढाळ आणि उलट्या होऊं लागल्या, तर, साखरेंत कापुराचा अर्क घ्यावा; किंवा, तो न मिळेल, तर निदान कापुराचा थोडासा चुरा तोंडांत टाकावा.

असे आणखीही पुष्कळ पर्याय सांगावयाचे आहेत. पण आज अवकाश नाहीं.

---

## नाक दिलें तो मोठा कीं नथ दिली तो मोठा?

कांहीं बायकांस आपल्या वस्त्रभूषणांविषयीं फार गर्व असतो; आणि त्यांनीं एकादा नवा बहुमोल दागिना आंगावर घातला, ह्मणजे त्यांस तो मिरवतां मिरवतां पुरेसें होतें. ही खोड फार वाईट आहे.

अशा प्रकारची एक श्रीमंत बाई होती. तिच्या नवऱ्यानें तिला एकदां दोन हजार रुपयांची नथ करून दिली. ती नाकांत घातल्यावर तिचा गर्व त्रिभुवनांत मावेनासा झाला. जें जें कोणी तिला भेटे, त्याच्या त्याच्या पाशीं ती आपल्या नव्या नथीच्या गोष्टी मोठ्या डौलानें सांगे, आणि आपल्या नवऱ्याच्या मोठेपणाची फार तारीफ करी. तें पुष्कळांस अगदीं वाईट दिसूं

लागलें. तरी, ती श्रीमंत असल्यामुळें तिच्या आड कोणी आलें नाहीं. शेवटीं, एका भक्तिमान् वृद्ध बाईची आणि तिची गांठ पडली. तेव्हां तिनें तें आपल्या नथीचें पुराण तिच्यापाशीं सोडिलें. तें ऐकून तिला त्रास आला. ती आपल्या नवऱ्याची स्तुति अतिशयित करूं लागली; ती तर तिला फारच वाईट लागली. शेवटीं, ती कटकट लवकर आटोपत नाहीं असें पाहून, ती वृद्ध बाई हळूच नम्रतेनें तिला ह्मणाली, "बाई, तुह्मी मोठ्या, तुमची नथ मोठी, आणि तुमचे यजमान मोठे, हें कांहीं मी खोटें ह्मणत नाहीं. पण, सर्वांहून मोठी अशी जी एक गोष्ट आपणां सर्वां माणसांस नेहमीं लक्षांत ठेविली पाहिजे, ती तुह्मी अगदीं विसरून गेलां अहां, ह्याचें मला फार वाईट वाटतें. अहो, ज्यानें नथ दिली, त्याचा मोठेपणा तुह्मीं एवढा वेळ गाइला; पण ज्यानें नाक दिलें, त्याचें तुह्मांला स्मरण तरी झालें काय? अहो, नाक दिलें तो मोठा, कीं नथ दिली तो मोठा? नाकच जर नसतें, तर तुह्मी नथ कोठें घालतां?" हें ऐकून ती बाई निरुत्तर झाली, आणि, नथीची बडबड करण्याचें सोडून, आपल्या घरच्या कामधंद्यास लागली.

ह्या गोष्टीवरून बोध घ्यावा. मनुष्य किती मोठा आणि किती पराक्रमी झाला, तरी, वस्तु उत्पन्न करणें हें त्याला कधीं यावयाचें नाहीं; तें देवाच्या हातीं आहे. मनुष्याला वस्तूची योजना करतां येते, एवढेंच काय तें. तेवढ्यावरून, त्यानें गर्वानें फुगावें, आणि, मूळ वस्तु उत्पन्नकर्त्यास विसरावें हें योग्य नाहीं.

---

# बालबोध.

## तैमुरलंग.



स्वपराक्रमानें विलक्षण कृत्यें करून उदयास आलेली मंडळी इतिहासांत प्रसिद्ध आहे; तींत तैमुरलंग हा आहे. खरें ह्मटलें असतां हा तार्तरी पुरुष; ह्याचा आणि हिंदुस्थानाचा कांहीं संबंध नसावा. परंतु, ह्यानें हिंदुस्थानावर स्वारी करून त्यास एक मोठा धक्का दिल्यावरून, हिंदुस्थानाच्या इतिहासांत त्याचें नांव आलें आहे. त्याचा संक्षिप्त वृत्तांत असा.

तैमुर हा, आशिआखंडांतल्या तार्तरी देशांत समर्कंद शहराजवळच्या एका खेड्यांत इ० स० १३३६ ह्या वर्षीं जन्मला. त्याच्या घरची अगदीं गरीबी होती. परंतु, तो वयांत येण्यास, आणि झेंगिजखानाच्या राज्याचे तुकडे तुकडे होऊन ते वेगळ्या वेगळ्या सरदारांनीं बळ-

कावण्यास गांठ पडली. आणि त्या सरदारांमध्यें हुसन-नामक सरदाराचा पक्ष धरून, त्याच्या शत्रूस तैमुरलंगानें पराजित केलें. त्या युद्धामध्यें त्याच्या एका पायास जखम लागून तो अगदीं जायबंदी झाला, आणि तेव्हां-पासून तो लंगडत चालूं लागला. त्यावरून त्याला तैमु-रलंगडा असें नांव पडलें. त्याचें तैमुरलंग झालें.

जसा हैदरअल्ली आपल्या आश्रयदात्यावर उठून आणि त्याचा नाश करून प्रबळ झाला, तसाच, तैमुर-लंग हा हुसनाची दुर्दशा करून, इ० स० १३६९ त राजा झाला. नंतर त्यास इतर देश जिंकण्याची इच्छा उत्पन्न झाली. त्यानें इराणावर स्वारी करून, तेथील सर्व राजांचा पराभव केला, आणि देशाची अगदीं धूळ-धाणी उडविली. इस्पहानशहरीं त्याची स्वारी होती तेव्हां, बंडखोर समजून, ७०,००० इराणी लोकांचीं डोकीं कापून, त्यांची रास त्यानें आपल्या छावणीसमोर घालविली.

ह्यानंतर किलशाक, आर्मिनिआ, जार्जिआ, इत्यादि प्रदेश पादाक्रांत करून, तैमुरलंग मोठ्या सैन्यासहव-र्तमान हिंदुस्थानावर स्वारी करण्याकरितां, इ० स० १३९८ ह्या वर्षी सिंधुनदाच्या पलीकडच्या तीरावर प्राप्त झाला. तेथें त्याला असें वर्तमान कळलें कीं, हिंदु-स्थानांतले राजे एकमेकांशीं कलह करीत आहेत. तेव्हां त्याला मोठा आनंद झाला, आणि त्यानें, आपल्या स-गळ्या सैन्यासहवर्तमान चाल करून, सरस्वती, फत्त्या-बाद, महाराजपुर इत्यादि शहरांची धूळधाणी करून, सेवटीं दिल्लीशहरावर हल्ला केला. त्या वेळीं तेथें तक्का-

वर महमूद तघलख बादशहा असून, त्याच्या दरबारीं मल्लुएकबलखान हा मोठा चतुर दिवाण होता. त्यांनीं स्वराज्यरक्षणार्थ पुष्कळ प्रयत्न केले; परंतु, ते सगळे व्यर्थ गेले. महमूदबादशहा गुजराथेंत पळून गेला; आणि इकडे दिल्लीशहर तैमुरलंगानें धुळीस मिळविलें. त्या प्रसंगीं जे अनर्थ झाले, ते नुसते कानांनीं ऐकिले तरी, आंगावर रोमांच उभे राहतात. सुमारें पंधरा दिवस दिल्लीस राहून, अपरिमित द्रव्य लुटून घेऊन, आणि असंख्य माणसांस ठार मारून, ह्या राक्षसाची स्वारी स्वदेशीं निघून गेली.

पुढें तैमुरलंगाची स्वारी एशिआमैनाराकडे वळली. तेथल्या एका प्रांताचा राजा बायाजीद हा होता. तोही मोठा पराक्रमी होता. त्याची आणि तैमुरलंगाची चांगलीच जुंपून राहिली. परंतु, इ० स० १४०२ ह्या वर्षीं अंगोरा येथें उभयपक्षांचें जें घोर युद्ध झालें, त्यामध्यें, तैमुरलंगाचा जय होऊन, बायाजीद ह्याचा अगदीं पराभव झाला. शेवटीं, बायाजीद हा तैमुरलंगाच्या हातीं लागला. तो त्याला एका मोठ्या लोखंडी पिंजऱ्यांत घालून आपल्या स्वारीबरोबर बाळगीत असे.

तैमुरलंगाच्या मनांत चीनदेश जिंकावयाचा होता. ह्मणून तो त्या स्वारीची तयारी करीत असतां त्यास एकाएकीं मोठें दुखणें येऊन, तो, जक्सार्तिसनदीच्या कांठीं ओमार येथें, इ० स० १४०५ ह्या वर्षाच्या फेब्रुआरी महिन्यांत मरण पावला. तेव्हां त्याला मुलगे व नातू मिळून एकंदर छत्तीस होते.

हा पुरुष किती कठिण हृदयाचा होता, हें त्याच्या

चरित्रावरून स्पष्ट दिसत आहे. तरी तो आपणास जनहितकर्ता ह्मणवीत असे! असो. ह्यावरून एवढें तर खरें झालें कीं, जनहितकर्ता ह्मणवून घेणें हें पाषाणहृदयास देखील भूषणावह वाटतें.

तैमुरलंगानें इतकीं शहरें घेऊन तेथें इतक्या लोकांची कत्तल उडविली, तरी, त्यांत एक गोष्ट विशेष लक्षांत ठेवण्यासारखी आहे. ती ही कीं, त्यानें कारागिरांच्या जीवास कधींही धक्का लाविला नाहीं; आणि, जितके कारागीर त्याच्या हातीं लागले, तितके सगळे, त्यानें, कामें करून घेण्याकारितां आपल्या राजधानीस पाठवून दिले.

त्याचा लेख एके ठिकाणीं असा आहे:— "ज्या राज्याचा पाया नीतीवर बळकट घातलेला नसतो, त्या राज्याचें वैभव लौकर धुळीस मिळून, तें नाश पावतें. ह्मणून, मीं आपलें राज्य, नीति व धर्म ह्यांवर बळकट स्थापिलें आहे." ह्या ह्मणण्यास आणि ह्या पुरुषाच्या कृतीस किती मेळ आहे बरें! असो. तथापि एवढें खरें कीं, मनुष्य कसाही असला तरी त्याला नीतीवांचून गत्यंतर नाहीं.

---

## लक्ष्मीमाहात्म्य.

### आर्या.

हे लक्ष्मी तव महिमा मोठ्या मोठ्यांसही नये गाया<br>
तेथें इतरजनांचा प्रयत्न जाईल कां न गे वांया. १.<br>
तुजवर जीव जनांचा सुखसाधन ह्मणुनि लागतो जितका<br>
स्त्रीवर सहोदरावर आईबापांवरी नसे तितका. २.

स्वत्प्राप्त्यर्थ श्रमती खटपटती झगडती रणीं मरती
वदती असत्य नाना-विध दुसरीं घोरपातकें करती. ३.
कीं तुझिया ठायीं जो गुण तो इतरीं न आढळे कोठें
त्याचा प्रभाव पाहुनि चित्ताला नवल वाटतें मोठें. ४.
तूझ्या योगें होती अवगुण ते गुण समस्तहि जनांत
याचा अनुभव येतो खुपतो तो नित्य शिष्टनयनांत. ५.
ज्याच्या येथें वससी तो असला कोळसा तसा काळा
तरि सांवळा म्हणुनियां करिती गौरव कधीं न कंटाळा. ६.
खादाड भला असला तर भोक्ता तो म्हणोनि वानीती
कृपण जनाला ह्मणती सावध बहु दूरदृष्टि हे रीती. ७.
भोळा शंकर पावे नांव अजागळ मनुष्य वेडगळ
ऐसा प्रकार उलटा स्वत्प्राप्तीनें घडे पहा सकळ. ८.
परिस निजस्पर्शानें लोहा करितो सुवर्ण कीं जैसें
तूं निजसहवासानें दुर्गुण करितेस ते सुगुण तैसे. ९.
हा भ्रम आहे अंतीं गुण ते गुण अगुण ते अगुण होती
रंग कितीहि दिसो परि खोटें खोटें खरें खरें मोतीं. १०.
ही भ्रांतिमूलकस्तुति ऐकुनियां जाणते जन न फसती
असतिसतीच्या भेदा समजुनियां स्वस्थ मानसें बसती. ११.
या दासाला लक्ष्मी भ्रम हा तिळही कदापि न पडावा.
व्यसनाचा लेश तसा त्यानें याला कधींहि न जडावा. १२.

---

## न्यायानें वागणें.

जगाच्या व्यवहारामध्यें न्याय ही फार मोठी शक्ति आहे. ती समर्थांस अत्यंत भूषणावह आणि गरीबांस केवळ आईसारखी आहे. तिच्या योगानें कितीएक नामांकित पुरुषांच्या चरित्रांस अनुपम शोभा आली आहे, आणि आजपावेतों कोट्यवधि अनाथांचें रक्षण झालें आहे. अशा प्रकारच्या गोष्टी इतिहासांत वाचल्या ह्म-

णजे मनास मोठा चमत्कार वाटून आनंद होतो. त्यांतली एक गोष्ट आज आह्मी येथें सादर करितों.

युरोपखंडांत प्रुशिआ ह्मणून एक मोठा देश आहे. तेथें फ्रेडरिक धि ग्रेट ह्या नांवाचा एक मोठा पराक्रमी राजा कितीएक वर्षांपूर्वीं होऊन गेला. प्रजापालनाच्या दक्षतेविषयीं आणि शहाणपणाविषयीं त्याची फार आख्या असे. त्यानें एके वेळीं आपल्या राजधानींत एक मोठा राजवाडा बांधिला. त्यांत तो जाऊन राहिल्यावर पाहूं लागला तों, त्याच्या तिसऱ्या मजल्याच्या खिडकींतून सगळें शहर दृष्टीस पडण्यास एक पाणचक्की आड येऊं लागली. ती तेथून काढून टाकावी, ह्मणून, त्यानें, ती तूं केवढ्याला विकत देशील असें त्या चक्कीवाल्यास आपल्या सेवकाकडून विचारविलें. त्यास त्यानें साफ उत्तर दिलें कीं, मला कोणी कितीही पैसा दिला, तरी मी आपली चक्की विकणार नाहीं.

तें उत्तर ऐकून राजाच्या अंगाचा संताप झाला, आणि त्यानें लागलींच माणसें पाठवून, त्यांजकडून ती चक्की पाडून टाकविली. त्या वेळीं तो चक्कीवाला त्यांस आड आला नाहीं; तरी, गंभीर मुद्रेनें ह्मणाला कीं, "राजा ही चक्की आतां पाडवीना कां! पण, प्रुशिआंतला न्याय आजच कांहीं नाहींसा झाला नाहीं."

नंतर त्यानें नुकसानीबद्दल राजावर फिर्याद केली. तेव्हां न्यायाधीशानें असा ठराव केला कीं, ती चक्की पूर्वीं होती तशी राजानें बांधून दिली पाहिजे, आणि शिवाय त्या चक्कीवाल्याचें जें नुकसान झालें असेल तें भरून दिलें पाहिजे. त्याप्रमाणें त्या राजास सर्व गोष्टी

कराव्या लागल्या. तेव्हां त्याला थोडें वाईट तर वाटलेंच; तरी, तो मनांत संतोष पावून ह्मणाला, "कांहीं चिंता नाहीं. पण, माझ्या राज्यामध्यें कायदे चांगले आहेत, आणि न्यायाधीश निस्पृह आहेत, ह्याचा मला फार आनंद वाटतो."

पुढें कांहीं दिवसांनीं तो चक्कीवाला मरण पावला, आणि त्याचा कोणी आप्त ती चक्की वापरूं लागला. तो अगदीं दरिद्री होता. त्याचा कामधंदा बरोबर चालेना, आणि त्याला निर्वाहाला कांहीं मिळेना. तेव्हां, पूर्वींच्या सगळ्या हकीकतीचें सगळें स्मरण देऊन, त्यानें राजास असा अर्ज केला कीं, "महाराजांची मर्जी असल्यास आतां मी ही चक्की विकण्यास तयार आहें; महाराजांनीं घ्यावी; ह्मणजे माझ्या गरीबींत मला मोठा हात दिल्यासारखें होईल." त्याच्या अर्जावर राजानें स्वहस्तें उत्तर लिहून दिलें; त्याचें तात्पर्य असें:— "माझ्या शेजारीदादा, तूं आपली चक्की विकूं नको; ती मी तुला विकूं देणार नाहीं. ती निरंतर तुझ्या वंशज्यांच्या स्वाधीन असावी, अशी माझी फार इच्छा आहे; कां कीं, ही चक्की ह्या देशाच्या इतिहासांत प्रसिद्धि पावलेली आहे. तथापि, तुला असे वाईट दिवस आलेले पाहून मला फार दुःख झालें आहे. ह्मणून, ह्या उत्तराबरोबर कांहीं रकम तुजकडे पाठविली आहे, ही तूं घे, आणि आपलें देणें वारून, कामधंदा स्वस्थपणें चालीव. मी तुझा शेजारी आहें, मजवर लोभ असूंदे, हे विनंति."

हें उत्तर पाहून त्या चक्कीवाल्यास जो आनंद झाला, तो किती ह्मणून वर्णावा? परमेश्वरानें कृपा करून असा

न्यायी आणि थोर मनाचा राजा आपणास दिला आहे॰ ह्मणून त्यानें त्याचे फार फार आभार मानिले; आणि जन्मभर राजाचें कल्याण चिंतिलें.

ही हकीकत फार चमत्कारिक आहे ! न्यायानें वागल्यानें, ही गोष्ट राजाच्या चरित्रास अत्यंत भूषणप्रद झाली आहे, आणि त्याच्यासारख्या इतर राजांस किस्याप्रमाणें उपयोगीं पडली आहे; आणखी तिच्या योगानें गरीबगुरीबांची निष्ठा न्यायावर दृढ झाली आहे, ती वेगळीच.

साधारण सर्व जनांस न्यायानें वागण्याचा कित्ता मिळावा, ह्मणून **विश्वंभर** असे पुरुष राजकुलांत उत्पन्न करितो, आणि त्यांजकडून अशीं अलौकिक कृत्यें करवितो. हा त्याचा मोठा प्रसाद होय. ह्याबद्दल आपण त्याचे निरंतर उपकार मानावे.

---

## पक्षी.

पक्ष ह्मणजे पंख; आणि ज्यांस पंख असतात, ते पक्षी होत. इतर प्राणी आणि पक्षी ह्यांच्यामध्यें मोठा भेद झटला ह्मणजे हा कीं, इतर प्राण्यांस स्थलांतराचीं साधनें पाय वगैरे असतात, आणि पक्ष्यांस पाय असून शिवाय पंख असतात. इतर प्राण्यांस जमिनीवर चालतां मात्र येतें; आणि पक्ष्यांस जमिनीवर चालतां येऊन हवेंत उडतां येतें. इतर प्राण्यांचीं हाडें भरींव असून त्यांत रक्तमांस भरलेलें असतें; आणि पक्ष्यांचीं हाडें अगदीं पोकळ असून त्यांत हवा भरलेली असते. पशूंच्या आंगांतल्या रक्तापेक्षां पक्ष्यांच्या आंगांतलें रक्त

अधिक गरम असतें. कांहीं पक्षी, ऋतुमानास अनुसरून देशांतर करीत असतात. इंग्लंडामध्यें स्वालो ह्या नांवाचे पक्षी आहेत. ते, त्या देशांत उन्हाळा असतो, आणि हवा गरम असते, तोंपर्यंत मात्र तेथें राहतात; आणि थंडीचे दिवस आल्याबरोबर, तो देश सोडून, एवढा थोरला महासागर ओलांडून, अमेरिका खंडांत, त्या वेळीं उन्हाळा आलेला असतो, तेथें जाऊन राहतात. ह्मणजे, ते हवेच्या स्वाधीन होऊन राहत नाहींत; तर, पृथ्वीवर, त्यांस आवडण्यासारखी हवा जेव्हां जेव्हां जिकडे जिकडे होते, तेव्हां तेव्हां तिकडे तिकडे ते जातात. तेव्हां, आरोग्याच्या संबंधानें ते इतर प्राण्यांपेक्षां अधिक सुखी असले पाहिजेत, हें उघड आहे.

विद्वान लोक इतर वस्तूंप्रमाणें पक्ष्यांविषयींही विचार आणि शोध करीत असतात. त्यांस पक्ष्यांच्या जाती आजपर्यंत सुमारें आठ हजार आढळल्या आहेत. त्यांचे त्यांनीं एकंदर पांच वर्ग केले आहेत. ते असेः—

**इतर प्राण्यांवर निर्वाह करणारे पक्षीः**—ह्यांच्या चोंची वांकड्या असून फार बळकट असतात. तशींच त्यांच्या पायांचीं नखें चांगलीं मजबूद असतात. बहिरीससाणा, घार, घुबड इत्यादि पक्षी ह्या वर्गांतले होत.

**झाडांमाडांवरून फिरणारे पक्षीः**—ह्यांच्या चोंची अगदीं चिंचोळ्या आणि बारीक असतात. त्यांच्या पायांस दोन पुढें आणि दोन मागें अशीं बोटें असतात. तीं त्यांस झाडांवर चढण्यास आणि फिरण्यास फार उपयोगीं पडतात. चिमण्या, कावळे इत्यादि पक्षी ह्या वर्गांतले होत.

**उकरणारे पक्षीः—** आपलें भक्ष्य वगैरे शोधण्याकरितां जे पक्षी जमीन उकिरडा वगैरे उकरितात. त्यांचा समावेश ह्या वर्गांत होतो. कोंबडे, कोंबड्या, मोरें, बदकें, इत्यादि पक्षी ह्यांतले होत.

**पाण्यांत फिरणारे पक्षीः—**ह्यांचे पाय लांब आणि बारीक असतात; आणि त्यांजवर केंसबीस कांहीं नसतात. ते थोड्याशा पाण्यांत चालतात तेव्हां त्यांचे पंख पाण्यांत भिजत नाहींत. त्यांचे पाय जसे लांब असतात, तशा त्यांच्या मानाही लांब असतात. ह्मणूनच त्यांचें भक्ष्य त्यांस टिपतां येतें. कर्कोचापक्षी हा ह्या वर्गांतला होय.

**पोंहणारे पक्षीः—** ह्यांचे पाय आंखूड असतात. ते बरेच मागच्या बाजूस असून, त्यांच्या बोटांच्या मध्यें पातळ कागदासारखी कातडी असते. त्यांच्या माना त्यांच्या पायांपेक्षां लांब असतात; ह्मणूनच त्यांस पाण्याच्या पृष्ठभागावर पोंहत असतां, बऱ्याच खोल पाण्यांतलें आपलें भक्ष्य धरितां येतें. बदकें, राजहंस, आणि हंसी हे पक्षी ह्या वर्गांतले होत.

पक्ष्यांविषयीं नानाप्रकारच्या चमत्कारिक गोष्टी विद्वान पुरुषांनीं पाहून प्रसिद्ध केल्या आहेत. त्यांत एक अशी आहे कीं, बहिरीससाणा हा पक्षी, आपल्या पिलांस, दुसरे पक्षी धरण्यास, अगदीं क्रमानें धडे घालून दिल्याप्रमाणें शिकवितो. ह्मणजे, तो अगदीं प्रथम, ठार मारलेलें एकादें लहानसें पांखरूं बाहेरून आणून, तें, अगदीं नीट त्यांच्या आंगावर वरून टाकून देऊन, तें त्यांला धरायास लावितो; नंतर कांहीं दिवसांनीं अर्धमेलीं केलेलीं पांखरें त्याप्रमाणें त्यांजकडून धरवितो;

आणि शेवटीं, जीवंत पांखरें, उडी घालून धरण्याच्या विद्येंत तो त्यांला प्रवीण करितो. केवढी ईश्वरी योजना ही! पोटास मिळविण्याची विद्या बहिरीससाणा देखिल जर आपल्या पिल्लांस शिकावितो, तर, स्वनिर्वाहाची विद्या माणसांनीं आपल्या मुलांस शिकवावी, हें किती अवश्य आहे बरें! ह्यावरून आईबापांनीं बोध घ्यावा.

---

## जगांत व्यर्थ असें कांहीं नाहीं.

कोणे एके वेळीं एक राजपुत्र आपल्या बागांतून फिरत असतां जवळच्या मंडळीस ह्मणाला, "ह्या गांधीलमाशा आणि हे कोळी देवानें केले तरी कशाला? त्यांचा कांहींएक उपयोग नाहीं."

ह्या गोष्टीस कांहीं दिवस लोटल्यावर तो राजपुत्र परचक्राशीं लढत असतां अगदीं पराभव पावला, आणि त्यास पळून जाऊन आपल्या जीवाचें रक्षण करणें भाग पडलें. तो एका झाडीमध्यें किंचित् विसांवा घेण्याकरितां पडला. तेथें त्याचा डोळा लागला. इतक्यांत त्याच्या शत्रूकडचा एक शिपाई त्याला पकडण्याकरितां हळूच त्याच्याजवळ येऊं लागला. त्या वेळीं एक गांधीलमाशी त्या राजपुत्राच्या तोंडावर बसली, आणि त्याला डसली. त्यासरसा जागा होऊन, तो तडफडून उभा राहिला, तों तो शत्रूकडचा शिपाई त्याच्याजवळ येऊन ठेपला. त्याला ओळखून, राजपुत्रानें आपल्या तरवारीनें त्याला ठार मारिलें. अशा प्रकारें गांधीलमाशी त्याच्या उपयोगीं पडली.

नंतर तो राजपुत्र तेथून उठून, एका गुहेंत जाऊन बसला. इतक्यांत, त्या गुहेच्या दाराच्या कोंपऱ्यांत जो एक ह्या-

तारा कोळी होता, त्यानें सहजगत्या, त्या दारावर, आपणाकरितां एक मोठें जाळें बांधिलें; आणि त्यांत एक किडा धरून, त्यास तो खात बसला. हें चाललें होतें, तोंच शत्रूकडचे दोन शिपाई तेथें आले. त्यांतला एकजण दुसऱ्यास ह्मणाला, "कायरे, तो राजाचा मुलगा ह्या गुहेंत तर लपून बसला नसेल ना?" त्यास दुसऱ्यानें उत्तर केलें, "अरे छि:! तूं वेडा तर नाहींस! राजपुत्र समरांगणांतून पळून गेल्याला अद्याप एक प्रहर देखील झाला नाहीं. आणि तो आतां इतक्यांत जर ह्या गुहेंत गेला असता, तर, हें कोळ्याचें जाळें हिच्या दारावर असें सबंद राहिलें असतें कसें?" हें बोलणें झाल्यावर, त्या गुहेंत जाण्याचा नाद सोडून देऊन, ते शिपाई तेथून निघून गेले. अशा प्रकारें कोळी राजपुत्राच्या रक्षणास कारणभूत झाला.

तेव्हांपासून तो राजपुत्र पक्कें समजला कीं, "जगांत व्यर्थ असें कांहीं नाहीं."

---

## विचारपूस करण्याचें तारतम्य.

दोन जुळे भाऊ होते. ते इतके एकसारखे दिसत कीं, हा कोणता आणि तो कोणता, हें देखील ओळखवत नसे. त्यांतला एकजण मरण पावला. आणि बाकी राहिलेला भाऊ एका भोळसर मनुष्यास एके वेळीं रस्त्यांत भेटला. तेव्हां, त्या माणसानें त्याला विचारिलें कीं, "मेला तो तूं किंवा जीवंत आहे तो तूं?" त्यावर त्या मुलानें उत्तर दिलें, "अहो, जीवंतांशीं जीवंत बोलतात, आणि मेलेल्यांशीं मेलेलीं बोलतात; ह्यावरून समजा." तें ऐकून, तो मनुष्य पुढें निघून गेला.

---

# बालबोध.

## रायबहादर क्रिस्तोदासपाल.



ताजमहालासारखी उत्तम इमारत तयार होण्यास चतुर कारागीर पाहिजेत; तसें, देशाचें खरें हित होण्यास देशामध्यें स्वदेशाभिमानी पुरुष पाहिजेत; ते नुसते देशाभिमानी उपयोगीं नाहींत; तर, त्यांच्या ठायीं विद्वत्ता पाहिजे. असे पुरुष ह्मणजे केवळ अमोलिक रत्नें होत.

रायबहादर क्रिस्तोदासपाल हे गृहस्थ ह्या प्रकारचे होऊन गेले. हे बंगाली होते. हे चांगल्या संभावित कुळांतले असून, ह्यांची घरची स्थिति साधारण होती. परंतु, ह्यांनीं लहानपणीं फार मेहनतीनें पुष्कळ अभ्यास करून, आपली योग्यता वाढविली. आलीकडच्या चा-

तीस पन्नास वर्षांत कलकत्त्यामध्यें जे कोणी फार नामांकित एतद्देशीय गृहस्थ होऊन गेले, त्यांत ह्यांची बरोबरी करणारे मुळींच नव्हते, असें ह्मटलें तरी चालेल. स्वदेशाचें हित कशांत आहे, हें त्यांस चांगलें कळलें होतें; आणि तें साधण्याविषयीं ते अखंड झटत असत. इंग्लिशभाषा ह्मणजे त्यांच्यापुढें जशी हात जोडून उभी होती. ते इ० स० १८६० ह्या वर्षी "हिंदुपेट्रिअट" नामक वर्तमानपत्राचे कर्ते झाले. तेव्हांपासून त्या पत्राची योग्यता वाढतां वाढतां शेवटीं इतकी वाढली कीं, हिंदुस्थानांतल्या राज्यप्रकरणाविषयीं त्या पत्रांतले लेख विलायतच्या पार्लमेंटसभेंत कधीं कधीं वाचीत असत. अशी त्यांची आख्या झाल्यावर त्यांस प्रथम बंगाल्याच्या लेफ्टेनेंट गव्हरनराच्या कायदेकौन्सिलाचे सभासद नेमिलें, आणि नंतर कांहीं दिवसांनीं लार्ड नार्थब्रुक ह्यांच्या वेळीं गव्हरनरजनरलाच्या कौन्सलाचे सभासद नेमिलें. नंतर त्यांस रायबहादर व सी. ऐ. ई. ह्या पदव्या मिळाल्या. त्यांनीं कायदेकौन्सलाचें काम उत्तम प्रकारें, अगदीं कोणाची भीड न धरितां केलें, त्यावरून त्यांचें वजन फार वाढलें.

स्वदेशहित हें आपल्या स्वतःच्या घरच्या कामापेक्षां त्यांस अधिक वाटे. त्याप्रमाणेंच, गरीबगुरीबांच्या उपयोगीं पडणें ह्यासारखें दुसरें पुण्यकर्म नाहीं, असें त्यांच्या मनानें घेतलें होतें. त्याप्रमाणें ते नित्य वागत असत; आणि तेणेंकरून, ते, सर्व जातींच्या आबालवृद्धांस अत्यंत प्रिय आणि पूज्य वाटत असत.

ते इ० स० १८८४ च्या जुलै महिन्यांत, कांहीं

दिवस आजारी पडून, सुमारें ४९ वर्षांचे होऊन मरण पावले. त्यांच्या योगानें स्वदेशहिताच्या कामास मोठी खळी पडली आहे; ती सहसा लवकर भरून यावयाची नाहीं. ते मोठे पापभीरु आणि ईश्वरभक्त होते. त्यांचें आचरण निर्मळ होतें. त्यांच्या मरणाचें वर्तमान ऐकून, सर्वांस अतिशयित वाईट वाटलें. नामदार लार्ड रिपन, कौन्सलामध्यें ह्मणाले, " क्रिस्तोदासपाल ह्यांची आह्मांला फार मोठी मदत होती. त्यांनीं स्वदेशाची सेवा मोठ्या आस्थेनें आणि स्वदेशाभिमानानें केली. त्यांस जें श्रेष्ठत्व प्राप्त झालें होतें, तें केवळ त्यांच्या परिश्रमांचें फळ होतें. ते मोठे वक्ते होते." हें वर्णन सामान्य नव्हे. लार्ड रिपनांसारख्या थोरांनीं ज्यांस थोर ह्मणावें, त्यांच्या थोरवीचें वर्णन किती करावें ?

असे क्रिस्तोदासपाल आमच्यांत उत्पन्न व्हावे, आणि त्यांच्या बुद्धिवैभवानें लार्ड रिपनांसारख्यांच्या मनांत हिंदुस्थानाच्या कल्याणाविषयीं विचार उत्पन्न व्हावे, हेंच परमेश्वरापाशीं मागणें आहे.

---

## नानासाहेब पेशव्यांचा शेवटचा विलाप.

### श्लोक.

हा ईश्वरा दिवस आज कसा उदेला  
आली पहा अवकळा सगळी घरेला  
हें सर्व शून्य दिसतें सुख यांत नाहीं  
लोकीं जिणें गमतसे यमयातना ही. १.  
चांडाळ दुष्ट यवनीं कपटीं प्रयासीं  
नेले खरे निज मनोरथ शेवटासी  
मातें अहा बुडविलें खर दुःखडोहीं  
कोणा तरी जवळ गोष्ट अतां वदों ही. २.

विश्वास ही प्रिय सदाशिव धैर्यशाली
वांछा तयां समर काय करूं जहाली !
तीच्या भरीं भरुनि काय अनर्थ झाला
हें काय गोड गमलें तुज विश्वपाला. ३.
ते धाकुटे वडिल मीं पहिलें मरावें
तें जाहलें उलट काय पुढें करावें
ज्यांहीं मदीय दिवस स्वकरीं करावे
त्यांचे करूं दिवस काय मला पडावें. ४.
मीं धाडिलें समर घोर तयां कराया
कोणी खरोखर म्हणेल रणीं मराया
चांडाळ मत्सम दुजा त्रिजगांत नाहीं
निंदूं नये मज कसें सकळां जनांहीं. ५.
चांडाळ मी अधम मी खळ पापराशी
थोरीं कुळीं उपजलों नकळे कशाशी
शोकार्णवांत जन मज्जित सर्व झाला
मी होय कारण खरोखर कीं तयाला ६.
ज्याच्या कृतीवरुनि दुःखित राष्ट्र होतें
तें काय माणुस कशास हवें अहो तें
विश्वेश्वरा मरण दे मज शीघ्र आतां
ना तूं म्हणे न वर हा व्यथिता अनाथा. ७.
हर हर जगीं ऐश्वर्याचा किती भ्रम हा तरी
शिव सुख तयामध्यें नाहीं अहो तिळही भरी
मम अनुभवा पाहा वाहा मनीं हरिच्या पदा
सुख न दुसरें कोठें लाधे खरें समजा सदा. ८.

---

## मायलेंकरांचें वेगळेपण.

मायलेंकरांचें ऐक्य असणें हें संसारांत अत्यंत सुखावह होतें, असा सर्वत्र अनुभव आहे. ह्मणून तें ऐक्य राखण्या-

विषयीं सज्जनांचे प्रयत्न चाललेले असतात; परंतु, दुराग्रह हा एक मोठा दुर्गुण मनुष्याच्या अंतःकरणांत प्रबळ असल्यामुळें, त्या ऐक्यांत व्यत्यय येतो; आणि मायलेंकरांची फुटाफुट होते. तथापि, त्यांतही जर लेंकरें खरोखर शहाणीं निपजलीं आणि दुराग्रहाचा दोष त्यांजकडे नसला, तर कधीं कधीं असें घडतें कीं, त्या फुटाफुटीच्या योगानें आईची फारशी हानि न होतां, मुलांचें चांगलें कल्याण होतें. असा एक प्रकार जगाच्या अर्वाचीन इतिहासांत झाला आहे; आणि त्याविषयीं सर्व विचारशील पुरुषांस मोठा चमत्कार वाटत आहे. तो प्रकार कोणता, तो आह्मी आतां येथें सांगतों.

इ० स० १४९२ ह्या वर्षीं कोलंबसानें अमेरिका शोधून काढिली. तेव्हां, तिजमध्यें ओसाड सुपीक जमीन विपुल आहे, आणि तींतल्या नद्यांत वगैरे सोनें पुष्कळ आहे, असा लौकिक ऐकून, व स्वदेशांतल्या कितीएक कटकटींस त्रासून, स्पेनचे लोक, फ्रान्सचे लोक आणि इंग्लंडचे लोक, आपल्या कुटुंबांसहवर्तमान, गलबतांत बसून, महासागर ओलांडून, तेथें जाऊन राहिले. त्या वेळीं तो प्रदेश अगदीं अरण्यमय होता. ह्यामुळें त्या लोकांस पुष्कळ कष्ट सोसावे लागले. तरी, त्यांनीं मोठ्या शहाणपणानें आपसांत सगळी व्यवस्था लावून घेतली, आणि त्यांच्या मूळ देशांच्या प्रभूंनीं, तेथें अधिकारी नेमून, त्यांस पुष्कळ साह्य केलें; तेणेंकरून, त्यांचे दिवस संसारसुखामध्यें मोठ्या आनंदानें जाऊं लागले. असे बरेच दिवस लोटल्यावर, इंग्लंडांतल्या दरबारी मंडळीच्या मनांत असें आलें कीं, आपल्या देशांतले जे लोक

अमेरिकेंत जाऊन राहिले आहेत, त्यांजवर बराच कर बसवून, सरकारच्या खर्चाकरितां पैसा उत्पन्न करावा. त्याप्रमाणें तेथें कायदे ठरूं लागले; तेव्हां अमेरिकेंतल्या इंग्लिश लोकांचें ह्मणणें असें पडलें कीं, तुह्मी आमचे सरकार आहांत, त्यापेक्षां तुह्मी आह्मांवर कर बसवा, आह्मी नको ह्मणत नाहीं; परंतु, पार्लमेंटसभेमध्यें इंग्लंडांतल्या प्रांतांच्या वतीनें बोलण्यास जसे लोक घेतां, तसे आमच्या प्रांतांच्या वतीनें बोलण्यास आमच्यांतले लोक घ्या; ह्मणजे, इंग्लंडांतले लोकांस आणि आह्मांस एकसारख्या रीतीनें वागविल्यासारखें होईल. परंतु, हें त्यांचें ह्मणणें इंग्लंडाचा राजा तिसरा जार्ज व त्याचें प्रधानमंडळ ह्यांस आवडलें नाहीं. त्यांनीं अमेरिकेंतल्या इंग्लिशलोकांवर सक्तीनें कर बसविण्याचा आग्रह धरिला, आणि इकडे, अमेरिकेंतल्या इंग्लिश लोकांनीं, ऐक्य करून, असा निश्चय केला कीं, कांहीं होवो, जीव जावोत अगर राहोत, इंग्लंडच्या राजाच्या दुराग्रहास आपण मान्य व्हावयाचें नाहीं, आणि त्याच्या स्वाधीन आपण रहावयाचें नाहीं. ह्याप्रमाणें उभयपक्षांकडे, एकमेकांस विरुद्ध असे मनोभाव अत्यंत प्रबल उत्पन्न होऊन, उभयपक्षांचा झगडा इ० स० १७७५ त चालू झाला. त्या वेळीं अमेरिकेंतल्या लोकांचे पुढारी जार्ज वाशिंग्टन आणि बेंजामिन फ्रांक्लिन हे गृहस्थ होते. हे पुरुष फार थोर मनाचे होते. ह्यांच्या मनांत आपल्या मूळ देशांतल्या लोकांशीं, ह्मणजे, पर्यायेंकरून आपल्या मातुश्रीशीं झगडावयाचें नव्हतें. इंग्लंडांतलें सैन्य अमेरिकेंत लढण्याकरितां गेलें, तें पाहून फार वाईट वाटून,

जार्ज वाशिंग्टन तर असें ह्मणाला कीं, "काय करावें? आपल्या देशबांधवांचें गुलाम होऊन रहावें एक, किंवा त्यांच्या मानेवर शस्त्र धरावें एक, असा कठिण वेळ आला आहे! उपाय नाहीं! गुलाम होऊन राहण्यापेक्षां न्यायपथानें मरणें बरें!"

पुढें अमेरिकेंतल्या लोकांच्या ठायीं विलक्षण देशाभिमान संचरून, त्यांनीं, आपलें द्रव्य, आपलें शरीर, आपले जीव आणि आपलें सर्व कांहीं, एकनिष्ठेनें त्याच्या भरीस घालून, इंग्लंडाशीं अशीं मोठीं युद्धें केलीं कीं, त्यांच्या योगानें इंग्लंड अगदीं टेंकीस आलें. आणि, अमेरिकेंतल्या लोकांनीं आपलीं संस्थानें स्वतंत्र, ह्मणजे त्यांचा संबंध इंग्लंडच्या राजाशीं कोणत्याही प्रकारचा नाहीं, ह्मणून, एक जाहीरनामा इ० स० १७७६ च्या जुलै महिन्यांत प्रसिद्ध केला. तो इंग्लंडास मान्य करावा लागला. तेव्हांपासून त्या संस्थानांचा कारभार उत्तम प्रकारें चालला आहे. तेथील लोक आपणांतलाच कोणी एक थोर माणूस पांच वर्षेंपर्यंत अध्यक्ष नेमून राज्यकारभार चालवितात. तेथल्या लोकांवर कराचें ओझें कमी आहे. कां कीं, त्यांस राजाचा खर्च नाहीं. अमेरिकेंतले लोक इंग्लंडांतल्या लोकांइतके—किंबहुना थोडे अधिकच—सुखी आणि विद्याचारसंपन्न झाले आहेत.

आह्मांवर जो राज्याधिकार तुह्मीं चालविणार त्याच्या कामांत आमचें मत घेतलें पाहिजे, एवढेंच काय तें अमेरिकेंतल्या लोकांचें ह्मणणें होतें, आणि तें यथायोग्य होतें. तें इंग्लंडानें दुराग्रहानें नाकबूल केलें. त्यामुळें पुष्कळ रक्तपात झाला, आणि शेवटीं अमेरिकेंतल्या

संस्थानांस इंग्लंड मुकलें. दुरभिमानाचा परिणाम असा व्हावयाचाच.

" बा दुरभिमान न बरा देईल घनपतिकरींहि खर्पर हा ! "

मोरोपंत.

---

## तारे.

ह्या विश्वाच्या रचनेंतील ज्या चमत्कारिक वस्तु, अगदीं देखील प्रयत्न न करितां सर्व माणसांच्या दृष्टीस पडतात, त्यांत ताऱ्यांचा समावेश होतो. तारे पाहिले नाहींत, असा डोळस मनुष्य एक देखील सांपडावयाचा नाहीं. अत्यंत प्राचीनकाळापासून, लहानमोठ्या सर्व देशांतलीं मनुष्यें ताऱ्यांविषयीं विचार करीत आलीं आहेत; परंतु, तारे हे खरोखर काय आहेत, ह्यांविषयीं कोणासही बरोबर खातरीनें असें कांहीं सांगवत नाहीं. तरी, विद्वान् पुरुषांनीं स्वकल्पनेनें अनुमानें बसवून, त्यांविषयीं कितीएक गोष्टी अशा सिद्ध केल्या आहेत कीं, अगदीं अडाणी माणसांस देखील, प्रमाणें पाहून, त्या खऱ्या ह्मणाव्या लागतात. आणि अशा गोष्टींवरून पुष्कळ अंशीं व्यापक असे जे नियम बसविले आहेत, त्यांच्या एकंदर संग्रहास ज्योतिषशास्त्र असें नांव आहे. त्यांतल्या ठोकळ ठोकळ कांहीं गोष्टी आह्मी येथें सांगतों.

आकाशाकडे केव्हांही पाहिलें असतां, त्याचा अर्धा भाग मनुष्याच्या दृष्टीस पडतो; अधिक पडत नाहीं. त्या अर्ध्या अवकाशांत सुमारें तीन हजार तारे त्याला नुसत्या डोळ्यांनीं दिसतात. ह्मणजे, नुसत्या डोळ्यांनीं

दिसतात असे सुमारें सहा हजार तारे सगळ्या आकाशांत झाले. ह्यांत भेद दोन आहेत. ह्मणजे कांहीं तारे अचल आहेत; ह्मणजे, ते आपल्या जाग्यांवरून कधीं हालत नाहींत; आणि कांहीं तारे चल आहेत, ह्मणजे ते आपल्या ठिकाणांवरून हालतात; ह्या चल ताऱ्यांस ग्रह अशी संज्ञा आहे. ताऱ्यांना आंगचें ह्मणजे स्वतःचें तेज असतें, आणि ग्रहांस तेज स्वतःचें नसून तें सूर्यापासून मिळतें. तारे चमकतात, आणि ग्रह चमकत नाहींत; ह्मणजे ग्रहांचा प्रकाश स्थिर असतो. तारे दुर्बिणींतून पाहिले तरी मोठे दिसत नाहींत, परंतु ग्रह मोठे दिसतात. कारण, तारे पृथ्वीपासून अति दूर आहेत तसे ग्रह नाहींत. ताऱ्यांच्या ठिकाणीं निरानिराळे रंगही दिसून येतात. रोहिणी, ज्येष्ठा व आर्द्रा हे तारे तांबडे आहेत; ब्रह्महृदय व चित्रा हे निळे आहेत; लुब्धक, अभिजित् व श्रवण हे हिरवे आहेत; स्वातीचा तारा पिंवळा आहे; आणि मघा, ध्रुव व उत्तरफल्गुनी हे तारे पांढरे आहेत.

नुसत्या डोळ्यांस जे सुमारें सहा हजार तारे दिसतात, त्यांच्या वर्णनास कांहीं तरी मार्ग असावा, ह्मणून, विद्वान पुरुषांनीं त्यांचे एकंदर १०८ समूह ह्मणजे पुंजके मानिले आहेत. ह्यांतले बारा पुंजके असे वसलेले आहेत कीं, एका वर्षांत सूर्य आकाशांतून ज्या मार्गानें स्थिर ताऱ्यांमधून प्रदक्षिणा करतोसा दिसतो, त्या मार्गाच्या अगदीं जवळ ते आहेत. त्या बारा पुंजक्यांस **राशी** असें ह्मणतात. त्यांचीं नांवें आणि अर्थ येणेंप्रमाणें:—

| नांव | | अर्थ. | नांव | | अर्थ. |
|---|---|---|---|---|---|
| मेष. | — | मेंढा | तुला. | — | तागडी. |
| वृषभ. | — | बैल. | वृश्चिक. | — | विंचू. |
| मिथुन. | — | जुळें. | धनु. | — | तिरकमटा. |
| कर्क. | — | खेंकडा. | मकर. | — | मगर. |
| सिंह. | — | सिंह. | कुंभ. | — | मडकें. |
| कन्या. | — | मुलगी. | मीन. | — | मासा. |

ह्या बारा पुंजक्यांतल्या प्रत्येक पुंजक्यांत पन्नासांहून अधिक तारे आहेत.

ह्या बारा राशींचे सत्तावीस पोटभाग कल्पिलेले आहेत; त्यांस नक्षत्रें ह्मणतात. त्यांचीं नांवें:—अश्विनी, भरणी, कृत्तिका, रोहिणी, मृगशीर्ष, आर्द्रा, पुनर्वसु, पुष्य, आश्लेषा, मघा, पूर्वफल्गुनी, उत्तरफल्गुनी, हस्त, चित्रा, स्वाती, विशाखा, अनुराधा, ज्येष्ठा, मूळ, पूर्वाषाढा, उत्तराषाढा, श्रवण, धनिष्ठा, शततारका, पूर्वभाद्रपदा, उत्तरभाद्रपदा आणि रेवती, अशीं आहेत. ह्यांपैकीं, आर्द्रा, चित्रा आणि स्वाती ह्या तीन नक्षत्रांत एक एकच तारा आहे; ह्मणजे, त्यांचे पुंजके नाहींत. पुनर्वसु, पूर्वफल्गुनी, उत्तरफल्गुनी, विशाखा, पूर्वाषाढा, उत्तराषाढा, पूर्वभाद्रपदा आणि उत्तरभाद्रपदा, ह्या आठांत दोन दोन तारे आहेत; अश्विनी, भरणी, मृगशीर्ष, पुष्य, ज्येष्ठा आणि श्रवण ह्या सहांत तीन तीन तारे आहेत; अनुराधा आणि धनिष्ठा ह्या दोहोंत चार चार तारे आहेत; रोहिणी, आश्लेषा, मघा, आणि हस्त ह्या चोहोंत पांच पांच आहेत; कृत्तिकांत

सहा आहेत; मूळांत अकरा आहेत; रेवतींत बत्तीस आहेत; आणि शततारकांत शंभर आहेत. ह्मणून, एकंदर सत्तावीस नक्षत्रें मिळून २१८ तारे होतात.

ह्यांखेरीज, लुब्धक, अगस्त्य, ब्रह्महृदय, अग्नि, अभिजित्, अपांवत्स, आपस्, अरुंधती, ध्रुव व सप्तर्षि, हे सोळा तारे आमच्या हिंदूंच्या प्राचीन ज्योतिषग्रंथांत वर्णिलेले आढळतात*.

आकाशाकडे पाहिलें ह्मणजे कितीएक नक्षत्रांत कांहीं चमत्कारिक आकृति दृष्टीस पडतात. अश्विनीचे तीन तारे मिळून एक घोडतोंड होतें; भरणीचे तीन तारे मिळून एक त्रिकोण होतो; मघांतल्या पांच ताऱ्यांपैकीं अगदीं दक्षिणेकडचा एक सोडून दिला ह्मणजे बाकीच्या चोहोंचा समांतरभुजचौकोन होतो; हस्ताचे पांच तारे मिळून हाताचा पंजा होतो; मूळाचे अकरा तारे मिळून विंचवाची नांगी होते; आणि रेवतीचे बत्तीस तारे मिळून बदामी वर्तुळ होतें.

वर सांगितलेल्या नक्षत्रांचीं नांवें यजुर्वेदांत आढळतात; आणि मघा आणि फल्गुनी हीं नांवें ऋग्वेदसंहितेंत आढळतात. आणखी, हे ग्रंथ निदान साडेतीन हजार वर्षांमागें रचलेले असावे, असें विद्वान पुरुषांनीं ठरविलें आहे. ह्यावरून एवढें उघड सिद्ध होतें कीं, हिंदुस्थानांतल्या आह्मां लोकांस ज्योतिषशास्त्र इतर लोकांपेक्षां पुष्कळ आधीं माहीत होतें.

असो. हे सृष्टचमत्कार जे विद्वान पुरुष दाखवितात,

---

१ अंबा, २ दुला, ३ नितत्नी, ४अभ्रयंती, ५मेघयन्ती, ६वर्षयंती, आणि ७ चपुणिका, हे सात तारे कृत्तिकांत आहेत, असें कृष्णयजु-
आहे.

ते धन्य होत. आणि ज्या विश्वंभरानें हे करून ठेविले आहेत, तो परम धन्य होय.

---

## गप्पेस गप्प.

दोन मित्र होते. त्यांतला एक सात्विक होता, आणि एक गप्पाड्या होता. एके दिवशीं बोलतां बोलतां,

**गप्पाड्या.**—अरे, मी गेल्या महिन्यांत दिल्लीस गेलों होतों; तेथल्या बाजारांत, देवळाच्या मोठ्या घुमटा-एवढाले कांदे मीं पाहिले! मला मोठें नवल वाटलें!

**सात्विक.**—खरेंच का? पण हिकडे पाहा, तें देवाचें करणें! त्यांत कांहीं विशेष नाहीं. पण, मी परवां पुण्यास गेलों होतों, तेथें एका कारखान्यांत एक तांब्याचें पातेलें पाहिलें. तें केवढें होतें ह्मणशील? तुला खरेंच सांगतों, त्यांत दहा दहा माणसांच्या दहा कुटुंबांस रहायास जागा अगदीं सहज पुरेल!

**गप्पाड्या.**—छिः! भलतेंच कांहींतरी सांगतोस! अरे, एवढें पातेलें कशालारे करतील?

**सात्विक.**—अरे वेड्या कशाला ह्मणजे? तूं दिल्लीस कांदे पाहिलेस ते शिजवायाला!

"गांठ पडली ठका ठका, तेंच वर्म बोले **तुका**."

---

## भगवद्गीतास्तुति.

### आर्या, मोरोपंती.

तुज भजत्या संसारीं वसतां गतिलाभ होय जो **गीते**,
त्यासि न पात्र भ्रमती श्रमती व्यर्थचि तपोनि जोगी ते. १
एकचि अध्याय पुरे किंबहुना श्लोक एक हा नियम,
गीते त्वदाश्रितजनीं तिळ हि करिल न बहु म[illegible]

---

